१/२५ श्री



# शिवस्वरोदय



ह्याचें संस्कृत मूळ पुस्तक
शुद्ध करून

वे॰ शा॰ सं॰ वामन एकनाथ शास्त्री केमकर
ह्यांजकडून करविलेल्या मराठी
भाषांतरासहित
हा ग्रंथ

पुणें पेठ शनवार मेहुणपुरा येथें रावजी श्रीधर गों-
धळेकर यांणीं आपले जगद्धितेच्छु
छापखान्यांत छा॰


किंमत दहा आणे. ट॰ ख॰ एक आणा
॥१० ॥१

सन १८६७ चा आक्ट २५ प्रमाणें गोंधळेकर यांणीं या ग्रंथा-
वर सर्वप्रकारें आपला हक्क ठेविला आहे.

तारीख २० माहे नोवेंबर सन १८७९ इ॰

आवृत्ति १ ली

# प्रस्तावना

शिव स्वरोदयशास्त्र हें योगशास्त्राचें अंग होय, यांतील विषय ज्योतिःशास्त्रा-प्रमाणें सर्वोपयोगी असून त्याचा प्रचार नसल्यामुळें त्यापासून होणारा लाभ न होतां त्याचें नां-वही बहुतेकास विदित नाहींसें झालें आहे. याचें कारण, हा ग्रंथ संस्कृत भाषेंत असून यांत सांगितलेल्या प्रकरणांस मुख्य आधार स्वराचा आहे म्हणून स्वरज्ञान नसल्यामुळें संस्कृतज्ञां-ची आणि भाषा ज्ञानाच्या अभावामुळें इतरांची या विषयांत प्रवृत्ति होत नाहीं असें जाणून ती अडचण दूर होण्यासाठीं सदरील ग्रंथाचें मराठी भाषांतर करून ते मूळासहित छापलें आहे. आ-तां स्वरज्ञानाचें रहस्य गुरुमुखा वांचून स्पष्ट समजणार नाहीं, हें खरें आहे; तथापि स्वरसंबंधीं कांहीं उपयुक्त माहिती भाषांतरांत दिली आहे.

यांत स्वर, तत्त्वें, युद्ध, ध्यान, वशीकरण, गर्भाधान, संवत्सरफल, रोग आणि मरण यावि-षयींचा निर्णय केला आहे. कोणते स्वरावर कोणतीं कृत्यें केलीं असतां सिद्धि होते व कोणत्या-कार्यास कोणता स्वर वर्ज्य, हा विचार थोडक्यांत असून अनुभवशीर सांगितलेला आहे, या-करितां या ग्रंथास सर्वलोक आपला उदार आश्रय देऊन आमच्या श्रमाचें साफल्य करतील अ-शी आशा आहे. या ग्रंथाचा खप बरासा झाल्यास आणखी कांहीं स्वरोदय आहेत त्यांचें ही भाषांतर करण्यास आह्मास उमेद येईल.

रावजी श्रीधर गोंधळेकर.



# अनुक्रमणिका



इतिस्वरोदयस्यानुक्रमणि·

श्री

श्रीगणेशायनमः

अथ

शिवस्वरोदयः

प्रारभ्यते.

महेश्वरंनमस्कृत्य शैलजांगणनायकं॥गुरुंच परमात्मानंभजेसंसारतारणं॥१॥

अर्थः- शंकर, पार्वती आणि गणपति यांस नमस्कार करून संसार समुद्रतारक जो सद्गुरु व परमात्मा यांस मी भजतो.॥१॥ ॥

देव्युवाच॥ देवदेवमहादेवकृपांकृत्वाममोपरि॥ सर्वसिद्धिकरंज्ञानंकथयस्वममप्रभो॥२॥

अर्थः- देवी (पार्वती) शंकरास ह्मणते:- हे देवाधिदेवा शंकरा, मजवर कृपाकरून सर्वकार्यांची सिद्धिकरणारें ज्ञान मला सांगा.॥२॥ ॥

कथंब्रह्मांडमुत्पन्नं कथंवापरिवर्त्तते॥कथंविलीयतेदेव वदब्रह्मांडनिर्णयं॥३॥ ॥ ७ ॥

अर्थः- हे देवा, हें ब्रह्मांड कसें उत्पन्न झालें, याची स्थिति (पोषण) कशानें होते, आणि याचा लय कसा होतो, हा ब्रह्मांडविषयींचा निर्णय मलासांगा.॥३॥ ॥ ॥ ७ ॥

ईश्वरउवाच॥ तत्त्वाद्ब्रह्मांडमुत्पन्नं तत्त्वेनपरिवर्त्तते॥तत्त्वेविलीयतेदेवि तत्त्वाद्ब्रह्मांडनिर्णयः४

अर्थः- शंकर ह्मणतात, हे देवि, तत्त्वापासून ब्रह्मांड उत्पन्न होतें, तत्त्वावरच याची स्थिति आहे, आणि तत्त्वाचे ठिकाणींच याचा लय होतो, या ब्रह्मांडाचा निर्णयही तत्त्वापासूनच समजतो.॥४॥ ॥

देव्युवाच॥ तत्त्वमेवपरंमूलं निश्चितंतत्त्ववादिभिः॥तत्त्वस्वरूपंकिंदेव तत्त्वमेवप्रकाशय॥५॥

अर्थः- देवी ह्मणते, तत्त्वच ब्रह्मांडाचें मूळ आहे असा तत्त्ववादी निश्चय करतात, परंतु तत्त्व कोणतें, त्याचें स्वरूपकाय? हें मला स्पष्ट कळेल असें आपण सांगावें॥५॥ ॥ ॥ ७ ॥

॥ ईश्वरउवाच ॥ निरंजनोनिराकारएकोदेवोमहेश्वरः॥ तस्मादाकाशमुत्पन्न माकाशाद्वायुसंभवः ६

अर्थः- मायारहित, निराकार, स्वयंप्रकाश,एक, सर्वांतर्यामी जो परमात्मा त्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु उत्पन्न झाला. ॥ ६ ॥

वायोस्तेजस्ततश्चाप-स्ततः पृथ्वीसमुद्भवः॥
एतानिपंचतत्वानिविस्तीर्णानिचपंचधा ॥ ७ ॥

अर्थः- वायूपासून तेज, तेजापासून उदक, आणि उदकापासून पृथ्वी याप्रमाणें उत्पन्न झालेलीं हीं पांचतत्वें प्रत्येक पांच पांच प्रकारानीं विस्तार पावलीं आहेत. ॥ ७ ॥

तेभ्योब्रह्मांडमुत्पन्नं तैरेवपरिवर्त्तते ॥ विलीयतेचतत्रैव तत्रैवरमतेपुनः ॥ ८ ॥ ॥ ८ ॥

अर्थः- त्या तत्वांपासून हें ब्रह्मांड उत्पन्न झालें, त्यांच्याच योगानें याची स्थिति होते, आणि हें त्या तत्वांतच शेवटीं लीन होऊन रहातें ८

पंचतत्वमयेदेहे पंचतत्वानिसुंदरि ॥ सूक्ष्मरूपेणवर्त्तंते ज्ञायंतेतत्वयोगिभिः ॥ ९ ॥ ॥

अर्थः- हे सुंदरि, या पंचतत्वांपासून उत्पन्न झालेल्या देहांत पांचतत्वें सूक्ष्मरूपानें आहेत त्यांस योगी जाणतात. ॥ ९ ॥

अथस्वरंप्रवक्ष्यामि शरीरस्थस्वरोदयं ॥ हंसचारस्वरूपेण भवेद्ज्ञानंत्रिकालजं ॥ १० ॥

अर्थः- आतां अकारादि स्वरांच्या उच्चारास मूलकारणजो शरीरस्थ स्वर त्याविषयीं सांगतों, जें स्वरज्ञान झालें असतां हंसचार (श्वास बाहेर येतांना व आंत जातांना क्रमानें हं आणि स असा उच्चार होतो तो.) याच्या स्वरूपावरून योगीजनास भूत भविष्य आणि वर्त्तमान या त्रिकालांचें ज्ञान होतें. ॥ १० ॥

गुह्याद्गुह्यतरंसार-मुपकारप्रकाशनं ॥ इदंस्वरोदयंज्ञानं ज्ञानानांमस्तकेमणिः ॥ ११ ॥ ॥

अर्थः- अत्यंत गोप्य, सर्वोपकारक आणि सारभूत हें स्वरोदयाचें ज्ञान

सर्वज्ञानांत केवळ शिरोमणी होय. ॥११॥ ॥ ॥ ७

सूक्ष्मात्सूक्ष्मतरंज्ञानंसुबोधंसत्यमत्ययं ॥ आ-
श्चर्यंनास्तिकेलोकेआधारंत्वास्तिकेजने ॥१२॥

अर्थ:- हें स्वरज्ञानअत्यंत सूक्ष्म असून सुबोध आणि सत्यत्वानें मती-
तीस येणारें आहे. नास्तिक लोकानांही आश्चर्यकरणारें,हें ज्ञान आ-
स्तिकजनास मोठा आधारच होय. ॥१२॥

अथशिष्यलक्षणं.

शांतेशुद्धेसदाचारे गुरुभक्त्येकमानसे ॥ दृढचि-
त्तेकृतज्ञेच देयंचैवस्वरोदयं ॥१३॥ ॥

अर्थ:- शांत, शुद्ध, आचारसंपन्न, गुरुभक्ति विषयीं तत्पर, दृढमना
चा आणि कृतज्ञ (उपकाराचेंस्मरणठेवणारा) अशा शिष्यास ह्यास्व-
रज्ञानाचा उपदेश करावा. ॥१३॥

दुष्टेचदुर्जनेक्रुद्धे नास्तिकेगुरुतल्पगे ॥ हीनस-
त्वेदुराचारेस्वरज्ञानंनदीयते ॥१४॥ ॥

अर्थ:- दुष्ट, दुर्जन, क्रोधी, अविश्वासी, गुरुस्त्रीशीं गमन करणारा,
धैर्यहीन व दुराचारी, अशा शिष्यास स्वरज्ञान देऊंनये. ॥१४॥

शृणुत्वंकथितंदेवि देहस्थंज्ञानमुत्तमं ॥ येनवि-
ज्ञातमात्रेण सर्वज्ञत्वंप्रणीयते ॥ १५ ॥ ॥

अर्थ:- हे देवि, आपलें शरीरांत असलेले स्वराविषयीं ज्ञान मी सां-
गतों तें ऐक,या स्वरज्ञानाच्या योगानें सर्व ज्ञान प्राप्त होतें. ॥१५॥

स्वरेवेदाश्चशास्त्राणि स्वरेगांधर्वमुत्तमं ॥ स्वरे
चसर्वंत्रैलोक्यं स्वरमात्मस्वरूपकं ॥१६॥ ॥

अर्थ:- सर्व वेदशास्त्रें आणि गायन हीं स्वराच्या आश्रयानेंच आहेत, किं-
बहुना सर्व त्रैलोक्य स्वराचे ठिकाणीं आहे व स्वर हें सर्वजगाचें स्वरू-
प होय. ॥१६॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

स्वरहीनश्चदैवज्ञो नाथहीनंयथागृहं ॥ शास्त्र-
हीनंयथावक्त्रं शिरोहीनंचयद्वपुः ॥१७॥ ॥

अर्थ:- स्वामी वांचून जसें घर, शास्त्र संस्कारा वांचून जसें मुख, अथ-

॰ शिरावांचून जसें शरीर त्याप्रमाणें स्वरज्ञाना शिवाय ज्योतिषी शोभत नाहीं. ॥१७॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

नाडीभेदंतथा प्राण-तत्त्वभेदंतथैवच ॥ सुषुम्ना मिश्रभेदंच योजानातिसमुक्तिगः॥१८॥ ॥

अर्थः- सर्वनाडींचा भेद व प्राणतत्त्वांतील भेद व सुषुम्नादिजें नाडीत्रय त्यांतील भेद जो जाणतो तो मुक्तीस जातो. ॥१८॥ ॥

साकारेवानिराकारे शुभवायुबलंकृते ॥ कथयंतिशुभंकेचित्स्वरज्ञानंवरानने ॥१९॥ ॥

अर्थः- स्वरज्ञात्यामध्यें कोणी ह्मणतात कीं साकार (व्यावहारिक) आणि निराकार (पारमार्थिक) कर्मास शुभवायूचें बल प्रशस्त होय. कोणी पारमार्थिककृत्यास वायुबळाची गरज नाहीं ह्मणतात. १९

ब्रह्मांडखंडपिंडाद्याः स्वरेणैवहिनिर्मिताः॥ सृष्टिसंहारकर्त्ताच स्वरःसाक्षान्महेश्वरः॥ २०॥

अर्थः- सर्व ब्रह्मांड व पिंड हे स्वरापासूनच निर्माण झाले; जगाची सृष्टि व संहार कर्ता जो ईश्वर तोही स्वररूपच आहे. ॥ २० ॥ ॥

स्वरज्ञानात्परंगुह्यं स्वरज्ञानात्परंधनं ॥ स्वरज्ञानात्परंज्ञानं नवादृष्टंनवाश्रुतं ॥ २१॥ ॥

अर्थः- स्वरज्ञानासारखें दुसरें गुह्य कांहीं नाहीं; स्वरज्ञान हेंच मुख्य धनहोय; स्वरज्ञानापेक्षां श्रेष्ठज्ञान तर कोठें पाहण्यांत नाहीं व ऐकण्यांतही नाहीं. ॥२१॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

शत्रुंहन्यात्स्वरबले तथा मित्रसमागमः ॥ लक्ष्मीप्राप्तिः स्वरबले कीर्त्तिः स्वरबलेसुखं ॥ २२ ॥

अर्थः- स्वरज्ञानाच्याबळानें शत्रुनाश, मित्र समागम, लक्ष्मीप्राप्ति, कीर्त्ति आणि सुख हीं फळें प्राप्त होतात. ॥२२॥ ॥ ७ ॥

कन्याप्राप्तिः स्वरबले स्वरतोराजदर्शनं॥ स्वरेण देवतासिद्धिः स्वरेणक्षितिपोवशः ॥ २३ ॥

अर्थः- स्वरबळानें कन्यापुत्रादि संतति प्राप्तहोते, स्वरानें राजदर्शन होतें, स्वरानें देवतासिद्ध होते, आणि स्वरज्ञानानें राजा वश होतो. ॥ २३ ॥

स्वरेणगम्यतेदेशो भोज्यंस्वरबलेतथा ॥ लघुदी-
र्घस्वरबले मलंचैवनिवारयेत् ॥ २४ ॥ ॥

अर्थः- स्वरबलावर देशाटन करावें, स्वरबलानें भोजन करावें, स्वराचेंब-
ळानें लघुशंका व मलत्याग करावा. ॥ २४ ॥ ॥ ७ ॥

सर्वशास्त्रपुराणादि स्मृतिवेदांगपूर्वकं ॥ स्वर-
ज्ञानात्परंतत्त्वं नास्तिकिंचिद्वरानने ॥ २५ ॥

अर्थः- हे सुंदरि, सर्वशास्त्रें, पुराणें, स्मृति आणि वेदांगें यांस स्वर-
ज्ञानाहून श्रेष्ठतत्त्व कांहींएक नाहीं. ॥ २५ ॥ ॥ ७ ॥

नामरूपादिकःसर्वो मिथ्यासर्वेषु विभ्रमः ॥ अ-
ज्ञानमोहितामूढा यावत्तत्त्वंनविद्यते ॥ २६ ॥

अर्थः- सर्वपदार्थमात्राचे ठिकाणीं नाम रूपादिक हा केवळ भ्रम हो-
य; जोंपर्यंत स्वररूप तत्त्वाचें ज्ञान नाहीं, तोंपर्यंत हे जीव अज्ञानानें
मोहित झालेले ह्मणून मूढ होत. ॥ २६ ॥ ॥ ७ ॥

इदंस्वरोदयंशास्त्रं सर्वशास्त्रोत्तमोत्तमं ॥ आ-
त्मघटप्रकाशार्थं प्रदीपकलिकोपमं ॥ २७ ॥

अर्थः- हें स्वरोदयशास्त्र सर्वशास्त्रांत उत्तमोत्तम होय, आत्मा ( पं-
चकोशात्मकजीव ) हाच कोणीएक कुंभ, यांत प्रकाश करणारें हें
स्वरशास्त्र केवळ महादीपाचे ज्वाळेप्रमाणें होय. ॥ २७ ॥ ॥

यस्मैकस्मैपरस्मैवा नप्रोक्तंप्रश्नहेतवे ॥ नस्मा-
देतत्स्वयंज्ञेय मात्मनोवाऽत्मनाऽत्मनि ॥ २८ ॥

अर्थः- हें स्वरोदयशास्त्र केवळ कोणी दुसरे प्रश्न करतील त्याकरतां-
च सांगितलें आहे असें नाहीं, तर हें आपलें आपण आपले ठिकाणींच
जाणावें. ॥ २८ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

नतिथिर्नचनक्षत्रं नवारोग्रहदेवता ॥ नचवि-
ष्टिर्व्यतीपातो वैधृत्याद्यास्तथैवच ॥ २९ ॥

अर्थः- या स्वरोदयशास्त्रांत विशेष तिथि, नक्षत्र, वार, ग्रह, आणि
देवता हें कांहीं नाहीं. यांत भद्रा, व्यतीपात वैधृति इत्यादि कुयोगांचा
दोष नाहीं. ॥ २९ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

कुयोगो नास्तिकोदेविभविता वा कदाचन ॥ प्रा-
प्तेस्वरबले शुद्धे सर्वमेव शुभं फलं ॥ ३० ॥ ॥

अर्थः- हे पार्वती, या स्वरशास्त्रांत कोणताही कुयोग मुळींच नाहीं, व पुढें ही उत्पन्न होणार नाहीं. स्वराचें बळ निर्मळतेनें प्राप्त झालें असतां सर्व शुभ फलच प्राप्त होतें. ॥३०॥ ॥ ७ ।

देहमध्ये स्थिता नाड्यो बहुरूपाः सुविस्तरात् ॥
ज्ञातव्याश्च बुधैर्नित्यं स्वदेहज्ञानहेतवः ॥ ३१ ॥

अर्थः- देहामध्यें अनेकरूपानें ज्या नाडी आहेत त्या सुज्ञपुरुषानीं आधीं सविस्तर जाणाव्या म्हणजे शारीरज्ञान होण्यास तें नाडीज्ञान कारण होतें. ॥ ३१ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

नाभिस्थानगकंदोर्ध्व-मंकुरादेवनिर्गताः ॥ द्विस-
प्ततिसहस्राणि देहमध्ये व्यवस्थिताः ॥ ३२ ॥

अर्थः- नाभिस्थानीं असलेल्या कंदापासून निघालेला जो अंकुर त्यांतून बाहत्तर हजार नाड्या निर्माण झाल्या त्या सर्व शरीरांत आहेत. ॥ ३२ ॥

नाडीस्था कुंडलीशक्ति-र्भुजंगाकारशायिनी ॥ त-
तो दशोर्ध्वगा नाड्यो दशैवाधः प्रतिष्ठिताः ॥ ३३ ॥

अर्थः- या नाडींत भुजंगाप्रमाणें शयन करणारी एक कुंडली नामक शक्ति आहे तिच्यावर दहा नाडी आहेत आणि खालीं दहा नाडी आहेत. ३३

द्वेद्वे तिर्यग्गते नाड्यौ चतुर्विंशति संख्यया ॥ प्र-
धाना दशनाड्यस्तु दशवायुप्रवाहकाः ॥ ३४ ॥

अर्थः- दोन बाजूंस दोन दोन मिळून चार वांकड्या गेलेल्या नाड्या आहेत या व पहिल्या २० मिळून २४. त्यांत दहा वायूस वाहणाऱ्या ज्या १० नाड्या त्या मुख्य होत. ॥ ३४ ॥ ॥ ॥ ७ ॥

तिर्यगूर्ध्वास्तथाऽधःस्था वायुदेहसमन्विताः ॥ च-
क्रवत् संस्थिता देहे सर्वाः प्राणसमाश्रिताः ॥ ३५ ॥

अर्थः- वांकड्या, वर गेलेल्या व खालीं असलेल्या सर्व नाड्या वायुसहित देहांत चक्राप्रमाणें राहिल्या आहेत, आणि त्या सर्वांस प्राणाचा आश्रय आहे. ॥ ३५ ॥ ॥ ५ ॥ ॥ ७ ॥

नासांमध्येदशश्रेष्ठा दशानांतिस्वउत्तमाः॥ इडा-
चपिंगलाचैवसुषुम्नाचतृतीयका ॥३६॥ ॥

अर्थ:- त्या सर्वनाड्यांतदहा श्रेष्ठ होत, त्या दहांतही इडा, पिंगला, आणि सुषुम्ना या तीन मुख्य होत. ॥३६॥ ॥ ॥ ७ ॥

गांधारी हस्तिजिह्वाच पूषाचैवयशास्विनी ॥ अ-
लंबुषाकुहूश्चैव शंखिनीदशमीतथा ॥ ३७ ॥

अर्थ:- चौथी गांधारी, पांचवी हस्तिजिह्वा, सहावी पूषा, सातवी यशास्विनी, आठवी अलंबुषा, नववी कुहू, आणि दहावी शंखिनी, याप्रमाणें दहानाडी जाणाव्या. ॥ ३७॥ ॥ ॥ ७ ॥

इडावामेस्थिताभागे पिंगलादक्षिणेस्मृता॥ सु-
षुम्नामध्यदेशेतु गांधारीवामचक्षुषि॥ ३८॥

अर्थ:- इडा वामभागीं आहे, पिंगला दक्षिणभागीं, सुषुम्नामध्यप्रदेशीं, आणि गांधारी वामनेत्राचे ठिकाणीं आहे. ॥३८॥ ॥

दक्षिणेहस्तिजिह्वाच पूषाकर्णेचदक्षिणे॥ य-
शास्विनीवामकर्णे आननेचाप्यलंबुषा॥ ३९॥

अर्थ:- हस्तिजिह्वा उजव्यानेत्राचे ठिकाणीं, पूषा उजव्या कानांत, यशास्विनी वामकर्णांत, आणि अलंबुषा मुखाचेठायीं वासकरते.॥ ३९॥

कुहूश्चलिंगदेशेतु मूलस्थानेतुशंखिनी॥ एवं
द्वारसमाश्रित्य तिष्ठंतिदशनाडिकाः ॥ ४०॥

अर्थ:- कुहू लिंगाचेठायींवशंखिनी मूलस्थानीं ( गुदस्थलीं ) वास्तव्य करते, याप्रमाणें दहानाडी शरीरद्वारांचा आश्रयकरून राहतात. ४०

इडापिंगलासुषुम्नाच प्राणमार्गेसमाश्रिताः ॥
एताहिदशनाड्यस्तुदेहमध्येव्यवस्थिताः॥४१॥

अर्थ:- इडा, पिंगला, आणि सुषुम्ना, या तीननाड्याप्राणमार्गाचा आश्रय करून राहतात, याप्रमाणें दहानाड्याशरीरांतील मुख्य होत.॥ ४१॥

नामानिनाडिकानांतु वातानांतुवदाम्यहं॥ प्रा-
णोऽपानःसमानश्चउदानोव्यानएवच॥ ४२ ॥

अर्थ:- आतां नाडींस आश्रयभूतजे शरीरस्थवायु त्यांचीं नांवें सांगतो.

प्राण, अपान, व्यान, उदान, व समान, हे पांच वायू मुख्य होत. ॥ ४२॥

नागः कूर्मोऽथ कृकलो देवदत्तो धनंजयः ॥ हृदि
प्राणो वसेन्नित्य-मपानो गुदमंडले ॥ ४३॥ ॥

अर्थः- नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, आणि धनंजय, हे पांच उपप्राण होत. आतां या दहा वायूंचीं स्थानें सांगतों:- प्राण नेहेमी हृदयाचे ठिकाणीं राहतो आणि अपान गुदस्थानीं राहतो. ॥ ४३॥ ॥

समानो नाभिदेशे तु उदानः कंठमध्यगः ॥ व्या-
नो व्यापी शरीरेषु प्रधाना दश वायवः ॥ ४४॥
प्राणाद्याः पंच विख्याता: नागाद्याः पंच वायवः ॥
तेषामपि च पंचानां स्थानानि च वदाम्यहं ॥ ४५॥

अर्थः- समान वायू नाभिस्थानीं, उदान कंठमध्याचे ठिकाणीं आणि व्यान सर्वशरीराचे ठायीं राहतो, याप्रमाणें हे दहा वायू मुख्य होत. ॥ ४४॥ प्राणादिक पांच वायूंचीं स्थानें सांगितलीं, आतां नागादिक पांच वायूंचीं स्थानें सांगतों. ॥ ४५॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

उद्गारे नाग आख्यातः कूर्म उन्मीलने स्मृतः ॥ कृ-
कलः क्षुतकृज्ज्ञेयो देवदत्तो विजृंभणे ॥ ४६॥

अर्थः- नागवायू ढेकर आणणारा होय, कूर्म नेत्रोन्मीलनकर्त्ता, कृकल हा शिंक आणणारा आणि देवदत्त हा जांभई देणारा होय, हे वायू स्थानीं राहून आपापले व्यापार करतात. ॥ ४६॥ ॥

नजहाति मृतं वापि सर्वव्यापी धनंजयः ॥ ए-
ते नाडीषु सर्वासु भ्रमंते जीवरूपिणः ॥ ४७॥

अर्थः- धनंजय नांवाचा वायू मात्र सर्वशरीरभर व्याप्त असून तो मरणानंतरही शरीरास सोडित नाहीं. याप्रमाणें हे वायु जीवरूपानें सर्व नाड्यांत भ्रमण करतात. ॥ ४७॥ ॥ ः॥ ॥ ७

प्रकटं प्राणसंचारं लक्षयेद्देहमध्यतः ॥ इडापिं-
गला सुषुम्नाभिर्नाडीभिस्तिसृभिर्बुधः ॥ ४८॥

अर्थः- बुद्धिमान् पुरुषानें देहाचे आंत प्राणसंचार होतो तो इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांवरून जाणावा. ॥ ४८॥ ॥

इडावामेचविज्ञेया पिंगलादक्षिणेस्मृता ॥ इडा
नाडीस्थितावामा ततोव्यस्ताचपिंगला ॥ ४९॥

अर्थ:- इडानाडी वामभागीं आहे व पिंगला दक्षिणभागीं आहे; म्हणून सामान्यतः ज्या डाव्या नाड्यात्या सार्‍या इडा, आणि उजव्या पिंगला जाणाव्या. ॥ ४९॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

इडायांतुस्थितश्चंद्रः पिंगलायांचभास्करः ॥
सुषुम्नाशंभुरूपेण शंभुर्हंसस्वरूपतः ॥ ५०॥

अर्थ:- इडानाडीचे ठिकाणीं चंद्र आहे, पिंगलेच्या ठिकाणीं सूर्य आहे आणि सुषुम्नेच्याठिकाणीं हं आणि स अशा मिश्रस्वरूपानें साक्षात् शंभुवास्तव्य करतो. ॥ ५०॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

हकारोनिर्गमेप्रोक्तः सकारेणप्रवेशनं ॥ हकारःशिवरूपेण सकारःशक्तिरुच्यते ॥ ५१॥

अर्थ:- स्वरनिघतांना हकाराचें उच्चारण होतें आणि पुनः आंत जातांना सकारपूर्वक जातो; त्यांत हकार हें शिवाचेंरूप, आणि सकार हें शक्तिरूप जाणावें. ॥ ५१॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

शक्तिरूपस्थितश्चंद्रो वामनाडीप्रवाहकः ॥ दक्षनाडीप्रवाहश्च शंभूरूपोदिवाकरः ॥ ५२॥

अर्थ:- वामनाडीस वाहवणारा चंद्र शक्तिरूपी होय, दक्षिणनाडीचा प्रवाहक जोसूर्य तो शंभुरूपी होय. ॥ ५२॥ ॥ ७ ॥

श्वासेसकारसंस्थेतु यद्दानंदीयतेबुधैः ॥ तद्दानंजीवलोकेऽस्मिन् कोटिकोटिगुणंभवेत् ५३

अर्थ:- श्वास सकाराचे ठिकाणीं असतां जें दान द्यावें तें या लोकांत कोटिगुण फलप्रद होतें. ॥ ५३॥ ॥ ॥ ७ ॥

अनेनलक्षयेद्योगी चैकचित्तःसमाहितः ॥ सर्वमेवविजानीयान्मार्गेवैचंद्रसूर्ययोः ॥ ५४ ॥

अर्थ:- या क्रमानें योगीपुरुषानें निश्चळचित्त करून चंद्र सूर्य नाडींच्यामार्गावरूनच सर्व जाणावें. ॥ ५४॥ ॥ ७ ॥

ध्यायेत्तत्त्वंस्थिरेजीवे अस्थिरेनकदाचन ॥ इ-

ष्टसिद्धिर्भवेत्तस्य महालाभोजयस्तथा ॥ ५५॥

अर्थ:- जीव स्थिर असतां तत्त्वचिंतन करावें जेव्हां चित्त अस्वस्थ अ
सतें तेव्हां करूं नये. जो स्थिरमनानें तत्त्वशोधन करतो त्यास इष्टसि
द्धि, महालाभ आणि जयहीं प्राप्त होतात. ॥ ५५॥ ॥ ७

चंद्रसूर्यसमभ्यासं येकुर्वंतिसदानराः ॥ अती
तानागतज्ञानं तेषांहस्तगतंभवेत् ॥ ५६॥ ॥

अर्थ:- जे पुरुष चंद्र आणि सूर्य यांचा चांगल्याप्रकारें अभ्यास क
रतात त्यांस भूत भविष्यज्ञान हस्तगत होतें. ॥ ५६॥

वामेचामृतरूपास्याज्जगदाप्यायनंपरं ॥ दक्षि
णेचरभागेनजगदुत्पादयेत्सदा ॥ ५७॥ ॥

अर्थ:- वामभागीं जी नाडी (इडा) ती अमृतरूपानें सर्वजगास
प्यायन ह्मणजे पुष्टि करणारी होय, दक्षिणेस जी पिंगला नाडी ती
चरभागेंकरून सर्व जगास उत्पन्न करते. ॥ ५७ ॥

मध्यमाभवतिक्रूरा दुष्टासर्वत्रकर्मसु ॥ सर्व-
त्रशुभकार्येषु वामाभवतिसिद्धिदा ॥ ५८॥

अर्थ:- मधली जी सुषुम्नानाडी ती सर्वकर्मांविषयीं निंद्य आणि क्रूर
होय, आणि वामनाडी सर्व शुभकार्यांत सिद्धीप्रद होय. ॥ ५८॥

निर्गमेतुशुभावामा प्रवेशेदक्षिणाशुभा ॥ चं-
द्रःसमस्तुविज्ञेयो रविस्तुविषमःसदा ॥ ५९॥

अर्थ:- घरांतून बाहेर निघतांनां वामनाडी शुभ होय, प्रवेशकालीं द
क्षिणनाडी प्रशस्त होय. चंद्र सम आणि रवि विषम होय.॥ ५९॥

चंद्रःस्त्रीपुरुषःसूर्यश्चंद्रोगौरोऽसितोरविः ॥ चं-
द्रनाडीप्रवाहेण सौम्यकार्याणिकारयेत् ॥ ६०

अर्थ:- चंद्र स्त्री आणि सूर्य पुरुष चंद्र गौरवर्ण व सूर्य नीलवर्ण होय,
करितां सर्व सौम्यकार्यें चंद्रस्वरांवर करावीं. ॥ ६० ॥ ॥ ९

सूर्यनाडीप्रवाहेण रौद्रकर्माणिकारयेत् ॥ सुषु
म्नायाःप्रवाहेण भुक्तिमुक्तिफलानिच ॥ ६१ ॥

अर्थ:- सूर्यनाडी प्रवाहानें उग्रकर्में करावीं, आणि सुषुम्नेच्या प्रव

भक्तिमुक्तिफलदायक कर्मे करावीं. ॥६१॥ ॥ ७ ॥

आदौचंद्रःसितेपक्षे भास्करोहिसितेतरे ॥ प्रति-
पत्तो दिनान्याहु-स्त्रीणित्रीणिक्रमोदये ॥ ६२॥

अर्थः- शुक्लपक्षीं आधीं चंद्र आणि कृष्णपक्षीं आधीं सूर्य अशा क्रमानें प्रतिपदेपासून तीनतीन दिवस चंद्र व सूर्य यास्वरांचे उदय बलिष्ठहोत.६२

सार्धद्विघटिके ज्ञेयः शुक्लेकृष्णेशशीरविः ॥ वह-
त्येकदिनेनैव यथाषष्टिघटीःक्रमात् ॥ ६३ ॥

अर्थः- चंद्र व सूर्य हे स्वर क्रमानें शुक्ल व कृष्ण यापक्षीं प्रत्येक २॥ अडीच घटका वहानात. याप्रमाणें बाराआवृत्ती एक अहोरात्रांत (६० घटिकांत) होतात. ॥६३॥ ॥:॥ ॥ ७ ॥

वहेत्युस्तहृदीमध्ये पंचतत्त्वानिनिर्दिशेत् ॥ प्रति-
पत्तो दिनान्याहु-र्विपरीतेविवर्जयेत् ॥ ६४ ॥

अर्थः- त्या प्रत्येक आवृत्तींतील २॥ घटिकांत पांचतत्त्वें वहातात ज्या प्रतिपदेस आधीं चंद्राचा उदय सांगितला आहे तेव्हां सूर्योदय किंवा सूर्याचेवेळेस चंद्र असें वैपरीत्य झाल्यास अशुभ होय. ॥ ६४ ॥ ॥

शुक्लपक्षेभवेद्वामा कृष्णपक्षेचदक्षिणा ॥ जा-
नीयात्प्रतिपत्पूर्व योगीतद्गतमानसः ॥ ६५॥

अर्थः- शुक्लपक्षीं प्रतिपदेस पूर्वी चंद्र व कृष्णपक्षीं आधीं सूर्य शुभ होय यासाठीं योगी पुरुषानें एकाग्र अंतःकरणें करून चंद्रसूर्याचें स्वर जाणावे. ॥ ६५ ॥ ॥ ॥ ७ ॥

शशांकंवारयेद्रात्रौ दिवावार्यभास्करं ॥ इत्य-
भ्यासरतोनित्यं सयोगीनात्रसंशयः ॥ ६६॥

अर्थः- रात्रीं चंद्रस्वर चालवूंनये, आणि सूर्यस्वर दिवसा निवारणकरावा. अशा क्रमानें अभ्यासांत जो निमग्न असतो तोच योगीहोय.६६

सूर्येणबध्यतेसूर्य श्चंद्रश्चंद्रेणबध्यते ॥ यो जा-
नातिक्रियामेतां त्रैलोक्यंवशगंक्षणात् ॥ ६७॥

अर्थः- सूर्यानें सूर्यबंद होतो आणि चंद्रानें चंद्र प्रतिबद्ध होतो. जरचंद्र बंद करावयाचा असेल तर डाव्या कुशीवर निजावें, किंवा डावे कांखेंत

कुबडी दाबून धरावी; याप्रमाणेंच सूर्यस्वरबंदकर्त्यानें उजवेकडे कुबडी धरावी व उजवे कुशीवर निजावें ) या क्रियेस जो जाणतो त्यास त्रैलोक्य ही क्षणांत वश होतें. ॥ ६७ ॥ ॥ ॥ ७ ॥

उदयंचंद्रमार्गेण सूर्येणास्तमनंयदि ॥ तदा तेगु
णसंघाता विपरीतंविवर्जयेत् ॥ ६८ ॥ ॥

अर्थ:- चंद्रतिथीस चंद्रमार्गानें उदय आणि सूर्यनाडीच्या मार्गानें अस्त जेव्हां होतो तेव्हां अनेकगुण उत्पन्न होतात, आणि जेव्हां याचें उलट होतें तेव्हां अनेक दोष होतात, याकरितां तें शुभ कार्यास वर्ज होय. ॥ ६८ ॥ ॥ ॥:॥ ॥ ॥ ७ ॥

गुरुशुक्रबुधेंदूनां* वासरेवामनाडिका ॥ सि-
द्धिदासर्वकार्येषु शुक्लपक्षेविशेषतः ॥ ६९ ॥

अर्थ:- गुरु, शुक्र, बुध, आणि चंद्र, या वारीं, त्यांत शुक्लपक्षीं विशेषें करून वामनाडी सर्व कर्मांस सिद्धिदायक होय. ॥ ६९ ॥ ॥

अर्कांगारकसौरीणां वासरेदक्षनाडिका ॥ स्म-
र्तव्याचरकार्येषु कृष्णपक्षेविशेषतः ॥ ७० ॥

अर्थ:- रवि, मंगळ, आणि शनि यांच्या वारीं दक्षिणनाडी चरकार्यास अत्युत्तम, त्यांत कृष्णपक्षीं विशेष फलदायक होय. ॥ ७० ॥ ॥

प्रथमंवहतेवायुर्द्वितीयंचतथानलः ॥ तृतीयं
वहतेभूमि-श्चतुर्थंवारुणी वहेत् ॥ ७१ ॥ ॥

अर्थ:- पहिल्यानें वायुतत्त्व वाहतें, दुसऱ्यानें अग्नितत्त्व, तिसरें भूमितत्त्व, चौथें वरुणतत्त्व, पांचवें आकाश मिळून पांचतत्त्वें दरएक घटिकेंत पृथक् पृथक् क्रमानें उदय पावतात. ॥ ७१ ॥ ॥ ७ ॥

सार्द्धद्विघटिकेपंच क्रमेणैवोदयंतिच ॥ क्रमा-
देकैकनाड्यांच तत्त्वानांपृथगुद्भवः ॥ ७२ ॥:

अर्थ:- प्रत्येक अडीच घटिकांत पांचतत्त्वें उदय पावतात; याप्रमाणें इडा व पिंगला यांत पांचतत्त्वांचा उदय होतो. ॥ ७२ ॥ ॥

अहोरात्रस्यमध्येतु ज्ञेयाद्वादशसंक्रमाः ॥ वृष-

---

* कोणी बुधवारीं सुषुम्नानाडी प्रशस्त असें म्हणतात.

कर्कटकन्यालि मृगमीनानिशाकरे ॥ ७३ ॥

अर्थः- दिवसाच्या व रात्रीच्या मिळून ६० घटिका, त्यांत चंद्रसूर्यांचीं बाराबारा संक्रमणें होतात तीं बारा लग्नें होत; त्यामध्यें वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर, आणि मीन, हीं लग्नें चंद्राचीं होत. ॥ ७३ ॥ ॥

मेषसिंहौचकुंभश्च तुलाचमिथुनंधनं ॥ उद-
येदक्षिणेज्ञेयः शुभाशुभविनिर्णयः ॥ ७४ ॥

अर्थः- मेष, सिंह, कुंभ, तूळ, मिथुन, आणि धन, हीं सूर्यलग्नें जाणावीं यावरून शुभाशुभांचा निर्णयकरावा. ॥ ७४ ॥ ॥

तिष्ठेत्पूर्वोत्तरेचंद्रो भानुःपश्चिमदक्षिणे ॥ द-
क्षनाड्याःप्रसारेतु नगच्छेद्याम्यपश्चिमे ॥ ७५ ॥

अर्थः- चंद्र हा पूर्व आणि उत्तर या दिशांचेठायीं राहतो, सूर्य पश्चिम व दक्षिण या ठिकाणीं राहतो, यासाठीं दक्षिणनाडींतून स्वर वाहतअसतां दक्षिण व पश्चिम यादिशांस जावूं नये. ॥ ७५ ॥ ॥

वामाचारप्रवाहेतु नगच्छेत्पूर्वउत्तरे ॥ परिपं-
थिभयंतस्य गतोऽसौननिवर्त्तते ॥ ७६ ॥ ॥

अर्थः- वामनाडीचा प्रवाह चालू असतां पूर्व व उत्तर या दिशांस जावूं नये, जर कोणी जाईल तर त्यास शत्रूचेंभय उत्पन्न होईल व तो गेलेला पुन्हा परत येणार नाहीं. ॥ ७६ ॥ ॥ ७ ॥

तत्रतस्मान्नगंतव्यं बुधैःसर्वहितैषिभिः ॥ त-
दातत्रतुसंयाते मृत्युरेवनसंशयः ॥ ७७ ॥ ॥

अर्थः- तस्मात् हिताची इच्छा करणारानीं वर सांगितलेल्या निषिद्धदिशेस जावूं नये ज्या स्वरास जी निषिद्धदिशा सांगितली आहे त्या दिशेस जाणारास मृत्यु होतो, असें समजावें. ॥ ७७ ॥ ॥ ७ ॥

शुक्लपक्षेद्वितीयाया मर्केवहतिचंद्रमाः ॥ दृश्य-
तेलाभदःपुंसां सौम्येसौख्यंप्रजायते ॥ ७८ ॥

अर्थः- शुक्लपक्षीं द्वितीयेस सूर्य वाहत असून चंद्रदर्शन झालें असतां लाभदायक व सौम्यकल्यांत सुखप्रद होय ॥ ७८ ॥ ॥ ७ ॥

सूर्योदयेयदासूर्यश्चंद्रश्चंद्रोदयेभवेत् ॥ सि-

शांतिसर्वकार्याणि दिवारात्रिगतान्यपि ॥ ७९॥

अर्थ- ज्या दिवसीं सूर्यस्वराचा उदय सांगितला आहे त्या दिवसीं सूर्यस्वर आणि चंद्रोदयाच्या दिवसीं चंद्रस्वर वाहत असतां सर्व कार्यें सिद्ध होतात, मग तीं कार्यें दिवसाचीं असोत किंवा रात्रीचीं असोत. ॥ ७९॥

चंद्रकालेयदासूर्यः सूर्यश्चंद्रोदयेभवेत् ॥ उद्वेगः कलहो हानिः शुभंसर्वंनिवारयेत् ॥ ८० ॥

अर्थ- चंद्रस्वराचे वेळीं सूर्यस्वर व सूर्यस्वराच्यावेळीं चंद्रस्वर चालू झाला असतां उद्वेग (भय,) कलह, हानि व शुभकल्याचें निवारण हीं होतात. ॥ ८० ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

सूर्यस्यवाहेमवदंति विज्ञा ज्ञानंह्यगम्यस्यतुनिश्चयेन ॥ श्वासेनयुक्तस्यतुशीतरश्मेः प्रवाहकालेफलमन्यथास्यात् ८१

अर्थ- सूर्यस्वराचा प्रवाह असतां अगम्य (अतर्क्य) अर्थाचें ही निश्चयानें ज्ञान होतें, आणि श्वासांत चंद्रस्वर असून त्याच्या प्रवाहांत अन्यथा फळ होतें म्हणजे अगम्य अर्थाचें ज्ञान होणार नाहीं. ८१

## अथविपरीतलक्षणम्

प्रत्यूषकालेन विपरीतोदयोभवेत् ॥ चंद्रस्थानेवहत्यर्को रविस्थानेचचंद्रमाः ॥ ८२॥

प्रथमेमनसोद्वेगं धनहानिर्द्वितीयके ॥ तृतीयेगमनंप्रोक्तं इष्टनाशंचतुर्थके ॥ ८३॥ पंचमेराजविध्वंसं षष्ठेसर्वार्थनाशनं ॥ सप्तमे व्याधिदुःखानि अष्टमेमृत्युमादिशेत् ॥ ८४॥

अर्थ- प्रभातकालीं स्वरांचा उदय जर विपरीत होईल तर (म्हणजे चंद्राच्या जागीं सूर्य व सूर्याचे जागीं चंद्र असें स्वर झाल्यास) त्याचें कालपरत्वें फल सांगतों:- पहिल्या दिवसीं विपरीत स्वर वाहत असल्यास मनांत उद्वेग होतो, दुसऱ्यांत धनहानि, तिसऱ्यांत गमन, चौथ्यांत इष्टनाश, पांचव्यांत राजविध्वंस, साहव्यांत सर्वार्थनाश, सातव्यांत व्याधि दुःखें (रोग) आणि आठव्यांत मृत्यु होतो असें जाणावें. ८२.८३.८४

कालत्रयेदिनान्यष्टौ विपरीतंयदावहेत् ॥ न-

दादुष्टफलंप्रोक्तं किंचिन्न्यूनंतुशोभनं ॥ ८५ ॥

अर्थः- प्रातर्मध्यान्ह व सायंकाल या कालत्रयाचेठायीं सांगितलेले-स्वर आठ दिवसांत ही विपरीत वाहत असल्यास दुष्टफल जाणावें. कांहीं न्यून असतां शुभ जाणावें. ॥ ८५ ॥ ॥ ८६ ॥

प्रातर्मध्यान्हयोश्चंद्रः सायंकालेदिवाकरः ॥ त-दानित्यंजयोलाभोविपरीतंविसर्जयेत् ॥ ८६ ॥

अर्थः- प्रातःकालीं व मध्यान्हकालीं चंद्र, व सायंकालीं सूर्य असेल, ते-व्हां जय व लाभ होतात. विपरीत झालेंतर अशुभ जाणावें. ॥ ८६ ॥

वामेवादक्षिणेवापि यत्रसंक्रमते शिवः ॥ कृ-त्वातत्पादमादौच यात्राभवति सिद्धिदा ॥ ८७ ॥

अर्थः- वामभागीं किंवा दक्षिणभागीं जिकडे स्वर वाहत असेल, तो पाय प्रथम पुढें करून प्रयाण केलें असतां सिद्धिदायक होतें. ॥ ८७ ॥

चंद्रःसमपदःकार्यो रविस्तुविषमःसदा ॥ पू-र्णपादंपुरस्कृत्य यात्राभवति सिद्धिदा ॥ ८८ ॥

अर्थः- चंद्रस्वर चालू असतां प्रथम सम पाउलें ह्मणजे २, ४ ६ अशीं आणि सूर्यस्वर चालू असतां विषम ह्मणजे ३, ५, ७ अशीं पाउलें टाकावीं; पूर्णपाद पुढेंकरून प्रयाण करावें ह्मणजे सिद्धि होते. ॥ ८८ ॥

यत्रांगेवहतेवायु-स्तदंगःकरसत्तलात् सुप्तो-त्थितो मुखंस्पृष्ट्वा लभतेवांछितंफलं ॥ ८९ ॥

अर्थः- ज्याभागीं वायु वाहतो त्या आंगच्या तळहातानें निजून उठतांच मुखास स्पर्शकरावा ह्मणजे इच्छितफल प्राप्त होतें. ॥ ८९ ॥

परदत्तेतथाग्राह्ये गृहान्निर्गमनेऽपिच ॥ य-दंगेवहतेनाडी ग्राह्यंतेनकरांघ्रिणा ॥ ९० ॥

अर्थः- दुसऱ्यास कांहीं देतानां किंवा दुसऱ्यापासून घेतानां आणि घरांतून बाहेर जातानां जी नाडी वाहत असेल त्या आंगचे हात पाय प्रथम पुढें करावें, आणि तें काम करावें ह्मणजे तें कार्य उत्तमहोतें ९०

नहानिःकलहोनैव कंटकैर्नापिभिद्यते ॥ निव-र्त्तेतेसुखीचैव सर्वोपद्रववर्जितः ॥ ९१ ॥ ॥

अर्थ:- त्या कृत्यांत कांहीं हानि व कलह होत नाहीं शत्रूंकडून त्याच नाश होत नाहीं, आणि निरुपद्रवीपणें घरास सुखेंकरून परत येतो.॥

गुरुबंधुनृपामात्ये-ष्वन्येषुशुभदायिनी ॥ पू-
र्णांगेखलुकर्त्तव्या कार्यसिद्धिर्मनःस्थिता ॥ ९२ ॥

अर्थ:- गुरु, बंधु, राजा, प्रधान, इत्यादिकांपासून कार्य कर्त्तव्य अस तां पूर्णांगानें त्या कृत्यास आरंभ करावा म्हणजे मनाप्रमाणें कार्यसि द्धि होते. ॥ ९२ ॥ ॥:॥ ॥ ७ ॥

अग्निचोराधर्मधर्मा अन्येषांवादिनिग्रहः ॥ क-
र्त्तव्याःखलुरिक्तायां जयलाभसुखार्थिभिः ९३

अर्थ:- अग्निदाह, चोरासदेणें, अधर्मकृत्य आणि वादिनिग्रह हीं क र्में रिक्तनाडीवर करावीं; म्हणजे कर्त्यास जय, लाभ व सुख हीं प्राप्त होतात. ॥ ९३ ॥ ॥ ✣ ॥ ॥ ७ ॥

दूरदेशेविधातव्यं गमनंतुहिमद्युतौ ॥ अभ्य
र्णदेशेदीप्तेतु तरणाविति केचन ॥ ९४ ॥ ॥

अर्थ:- कित्येक लोकांचें मत असें आहे कीं दूरदेशीं गमन कर्त्तव्य अ सतां चंद्रस्वरावर जावें आणि समीपदेशांत जावयाचें असल्यास सूर्यस्वरावर गमन करावें. ॥ ९४ ॥ ॥ ७ ॥

यत्किंचित्पूर्वमुद्दिष्टं लाभादिसमरागमः ॥ त-
त्सर्वंपूर्णनाडीषु जायतेनिर्विकल्पकम् ॥ ९५ ॥
शून्यनाड्यांविपर्यस्तं यत्पूर्वंप्रतिपादितं ॥ जा-
यतेनान्यथाचैव यथासर्वज्ञभाषितम् ॥ ९६ ॥

अर्थ:- जें पूर्वी सांगितलें तें व लाभाचें कृत्य आणि युद्ध हीं कृत्यें पू र्णस्वरावर करावीं, म्हणजे परिपूर्ण होतात. ॥ ९५ ॥ आणि हीं कृत्यें शून्यनाडीवर केलीं असतां पूर्ण होत नाहींत; असें सर्वज्ञ जो शंकर त्याचें वचन आहे. ॥ ९६ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

व्यवहारेखलोच्चाटे द्वेषिविद्यादिवंचके ॥ कु-
पितस्वामिचोराद्ये पूर्णस्थाःस्युर्भयंकराः ॥ ९७

अर्थ:- व्यापार, खलांचें उच्चाटन, द्वेषकरणारे लोकांची वंचना, रा

वलेल्या स्वामीचें दर्शन, चोरांचीगांठ याप्रसंगीं पूर्णनाडी भयंकर होत. याकर्त्तां आपली रिक्तनाडी वरलिहिलेल्यांकडे करून उभे रहावें.।।९७।।

दूराध्वनिशुभश्चंद्रो निर्विघ्नोऽभीष्टसिद्धिदः ।। प्र-
वेशकार्यहेतोच सूर्यनाडीप्रशस्यते ।। ९८ ।। ।।

अर्थः- दूरमार्गास जातानां चंद्रस्वर निर्विघ्नतेनें इष्टसिद्धि करणारा होय आणि प्रवेशकार्यास सूर्यनाडी प्रशस्त होय. ।। ९८ ।। ।। ७ ।।

अयोग्योयोग्यतानाड्या योग्यस्थानेऽप्ययोग्यता।।
कार्यानुबंधनोजीवो यथारुद्रस्तथाचरेत् ।। ९९ ।।।।

अर्थः- नाडीच्या योगानें अयोग्यास योग्यता प्राप्त होते आणि योग्य प्राणी अयोग्यतेस प्राप्त होतो; याकरितां जीवानें आपल्या कार्यास योग्य- अशा नाडीचा उपयोग करावा व जसा वायु असेल तसें वागावें.।।९९।।

चंद्रचारे विषहृते सूर्यो बलिवशंनयेत् ।। स्रुषु-
म्नायांभवेन्मोक्ष एकोदेवस्त्रिधास्थितः।।१००।।

अर्थः- चंद्रस्वर चालू असतां इतरानीं केलेले अपकार सहन करतो, सूर्यस्वरांत बलवानासही वश करतो. सुषुम्नानाडी चालू असतां मोक्ष होतो. याप्रमाणें एकदेव तीन प्रकारानें राहिला आहे. ।।१०० ।। ।।

शुभान्यशुभकार्याणि क्रियंतेऽहर्निशंयदा ।। त-
दाकार्यानुरोधेन कार्यनाडीप्रचालनं ।। १०१ ।।

अर्थ- शुभ किंवा अशुभ कार्यें रात्रीं व दिवसा जीं कर्त्तव्य असतील- त्या कार्यानुरूप नाडीचें चलन करावें. ।। १०१ ।। ।। ७ ।।

## अथ इडा.

स्थिरकर्मण्यलंकारे दूराध्वगमनेतथा ।। आ-
श्रमेधर्मप्रासादे वस्तूनांसंग्रहेऽपिच ।।१०२।।

अर्थः- स्थिरकर्मे, अलंकार, दूरदेशगमन, आश्रम, धर्म, गृह व वस्तुसंग्रह या कृत्यांस इडा म्हणजे चंद्रनाडी प्रशस्त होय.।। १०२।। ।।

वापीकूपतडागादि प्रतिष्ठास्तंभदेवयोः ।। यात्रा
दानेविवाहेच वस्त्रालंकारभूषणे ।। १०३ ।। ।।

अर्थः- विहीर आड व तळीं बांधणें, स्तंभ व देव यांची प्रतिष्ठा, यात्रा, दा-

न, लग्न, वस्त्र आणि अलंकारधारण यां कृत्यांस चंद्र (वाम) नाडी प्र
शस्त होय. ॥ १०३ ॥ ॥ * ॥ ॥ ७ ।

शांतिकेपौष्टिकेचैव दिव्यौषधिरसायने ॥ स्वस्वा-
मिदर्शनेमित्रे वाणिज्येकणसंग्रहे ॥ १०४ ॥ ॥

अर्थ- शांतिकर्म, पौष्टिक, दिव्यऔषधि, रसायनें, स्वकीयजन व स्वा
मी यांचें दर्शन, मित्रसंग्रह, व्यापार व धान्यसंग्रह हीं कृत्यें इडाना
(चंद्र) चालू असतां शुभ होत. ॥ १०४ ॥ ॥ ७ ।

गृहप्रवेशेसेवायां कृषौचबीजवापने ॥ शुभक-
र्माणिसंधौच निर्गमेचशुभःशशी ॥ १०५ ॥

अर्थ- गृहप्रवेश, सेवा, कृषि, बीजपेरणें, संधि (तह करणें) निर्गम अ
णि इतर शुभकर्मे यांस चंद्रनाडी शुभ होय. ॥ १०५ ॥ ॥ ७ ।

विद्यारंभादिकार्येषु बांधवानांचदर्शने ॥ जन्म-
मोक्षेचधर्मेच दीक्षायांमंत्रसाधने ॥ १०६ ॥
कालविज्ञानसूत्रेतु चतुष्पादगृहागमे ॥ काल
व्याधिचिकित्सायां स्वामिसंबोधनेतथा १०७

अर्थ- विद्यारंभ, बंधुदर्शन, जन्म (उपनयन) मोक्ष, धर्म, दीक्षा, मंत्रसि
द्धि, कालविज्ञान व सूत्र यांचें अध्ययन, चतुष्पाद घरास आणणें, काल व
व्याधीची चिकित्सा करणें व स्वामीस बोलावणें यां कृत्यांस चंद्रनाडी
शुभ होय. ॥ १०६ ॥ १०७ ॥ ॥ ॥ ७ ।

गजाश्वारोहणेधन्वि-गजाश्वानांचबंधने ॥ परो-
पकरणेचैव निधीनांस्थापनेतथा ॥ १०८ ॥ गी-
तवाद्यादिनृत्यादौ नृत्यशास्त्रविचारणे ॥ पुर-
ग्रामनिवेशेच तिलकक्षेत्रधारणे ॥ १०९ ॥ ॥

अर्थ- नूतन हत्ती व घोडा यांवर आरोहण, गजाश्वांचें बंधन, परोपकार
निधिस्थापन, गायन, वाद्य व नृत्य यांस आरंभ, गीतशास्त्रविचार, शहर
किंवा ग्राम यांत प्रवेश, तिलकधारण आणि क्षेत्र-(शेत) ग्रहण या कृ
त्यांस चंद्र-(इडा) नाडी शुभ होय. ॥ १०८ ॥ १०९ ॥ ॥ ७

आर्त्तिशोकविषादेच ज्वरितेमूर्छितेऽपिवा ॥ स्व-

जनस्वामिसंबंधे अन्नादेर्दारुसंग्रहे॥ ११०॥ ॥

अर्थः- दुःख, शोक, विषाद, ज्वर, मूर्च्छा, स्वजन व स्वामि यांचा संबंध, आणि अन्नादिक व काष्ठें यांचा संग्रह या कृत्यास चंद्रनाडी प्रशस्त होय॥ ११०॥

स्त्रीणां दंतादिभूषायां वृष्टेरागमने तथा॥ गुरुपूजा विषादीनां-चालने च वरानने॥ १११॥ इडायां सिद्धिदं प्रोक्तं योगाभ्यासादिकर्म च॥ तत्रापि वर्जयेद्वायुं तेजआकाशमेव च॥ ११२॥ ॥

अर्थः- स्त्रियांचीं दंतादिभूषणें ( बांगड्या फणी वगैरे ) वृष्टीचा आरंभ, गुरुपूजा, विषादिकांचे चालन ( बाहेर पाडणें ) आणि योगाभ्यासादिकर्में हीं सर्व कृत्यें इडा ( वाम ) नाडीवर केलीं असतां सिद्धीस जातात; परंतु त्यांतील वायु, तेज, आणि आकाश हीं तत्त्वें वर्ज्य होत. ॥ १११॥ ११२॥ ॥

सर्वकार्याणि सिध्यंति दिवारात्रिगतान्यपि॥ सर्वेषु शुभकार्येषु चंद्राचारः प्रशस्यते॥ ११३॥ ॥

अर्थः- हीं वर सांगितलेलीं कृत्यें दिवसां किंवा रात्रीं केलीं तरी सिद्ध होतात. एवंच सर्व शुभकृत्यांत चंद्रनाडी प्रशस्त होय.॥ ११३॥ ॥ ७ ॥

अथ पिंगला.

कठिनक्रूरविद्यानां पठने पाठने तथा॥ स्त्रीसंगवेश्यागमने महानौकाधिरोहणे॥ ११४॥ भ्रष्टकार्ये सुरापाने वीरमंत्राद्युपासने॥ विह्वलोध्वंसदेशादौ विषदाने च वैरिणां॥ ११५॥ शास्त्राभ्यासे च गमने मृगयापशुविक्रये॥ इष्टिकाकाष्ठपाषाण-रत्नघर्षणदारुणे॥ ११६॥ ॥

अर्थः- कठिण व क्रूर अशा विद्यांचें पठन किंवा अध्यापन, स्त्रीसंग, वेश्यागमन, महानौकेंत आरोहण, दुष्टकृत्य, सुरापान, वीरमंत्रादिकांची उपासना, विह्वलता, देशविध्वंस, वैऱ्यास विष देणें, शास्त्राभ्यास, गमन, मृगया, जनावरांचें युद्ध, इष्टका ( विटा ) पाषाण, काष्ठ, रत्न यांचें घर्षण आणि इतर दारुण कृत्यें यांस पिंगला ( सूर्य ) नाडी प्रशस्त होय. ११४. ११५. ११६.

दुःखशोकादिक चंद्रनाडीवर प्राप्त झाले असतां लौकर नाहींसे होतात.

गत्यभ्यासेयंत्रतंत्रे दुर्गपर्वतरोहणे ॥ द्यूतेचौर्ये गजाश्वादि रथसाधनवाहने ॥ ११७ ॥ व्यायामेमारणोच्चाटे षट्कर्मादिकसाधने ॥ यक्षिणीयक्षवेताल विषभूतादिनिग्रहे ॥ ११८ ॥ खरोष्ट्रमहिषादीनां गजाश्वारोहणेतथा ॥ नदीजलौघतरणे भेषजेलिपिलेखने ॥ ११९ ॥ ॥

अर्थ- द्यूतक्रीडा, अश्व, गज, रथ इत्यादि वहनांची सिद्धता अथवा त्यांवर आरोहण करणें, चौर्यगतींचा अभ्यास, यंत्र, तंत्र, किल्ला व पर्वत यांवर चढणें, व्यायाम, मारण, उच्चाटन, षट्कर्में, यक्षिणी, यक्ष, वेताल, विष आणि पिशाच यांचें निवारण, गर्द्दभ, उंट, महिष, गज व अश्व इत्यादिकांवर आरोहण, नदीच्या उदकांतून पार जाणें, तीव्र औषधें व लिपींचें लेखन यांसर्व कृत्यांस दक्षिणनाडी प्रशस्त होय. ॥ ११७ ॥ ११८ ॥ ११९ ॥

मारणेमोहनेस्तंभे विद्वेषोच्चाटनेवशे ॥ प्रेरणेकर्षणेक्षोभे दानेचक्रयविक्रये ॥ १२० ॥ प्रेताकर्षण विद्वेष शत्रुनिग्रहणेऽपिच ॥ खड्गहस्तेवैरियुद्धे भोगेवाराजदर्शने ॥ भोज्येस्नानेव्यवहारे दीप्तकार्येरविः शुभः ॥ १२१ ॥

अर्थ- मारण, मोहन, स्तंभन, द्वेष उच्चाटन, वशीकरण, प्रेरण, आकर्षण क्षोभ, दान, क्रयविक्रय, प्रेताचें हरण, शत्रुनिग्रह, वैऱ्यांशीं युद्ध, भोग, राजदर्शन, भोजन व स्नान यां कृत्यांस पिंगलानाडी प्रशस्त होय. १२०.१२१

भुक्तमार्गेणमंदाग्नौ स्त्रीणांवश्यादिकर्मणि ॥ शयनंसूर्यवाहेन कर्त्तव्यंसर्वदाबुधैः ॥ १२२ ॥ क्रूराणि सर्वकर्माणि चराणिविविधानिच ॥ तानिसिद्ध्यंतिसूर्येण नात्रकार्याविचारणा ॥ १२३ ॥

अर्थ- भोजनानें अग्निमंद करणे, स्त्रियांचें वशीकरण व शयन हें सर्व सूर्यस्वरावर करावें. सारांश क्रूर व चर अशीं सर्व कर्में सूर्य स्वरावर केलीं असतां सिद्ध होतात, यांत संशय नाहीं. ॥ १२२ ॥ १२३ ॥ ॥ ७

अथसुषुम्ना.

क्षणंवामेक्षणंदक्षे यदावहतिमारुतः ॥ सुषु-
म्नासाचविज्ञेया सर्वकार्यहरास्मृता ॥ १२४ ॥

अर्थः- वायु (स्वर) क्षणभर डावेकडे व क्षणांत उजवेकडे जेव्हां वाहतो, तेव्हां सुषुम्नानाडीचा प्रचार आहे असें जाणावें ही सुषुम्ना सर्वकार्यांचा नाशकरणारी होय. ॥ १२४ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

तस्यांनाड्यांस्थितोवह्नि-र्ज्वलतेकालरूपकः॥ वि-
षवत्तंविजानीया-त्सर्वकार्यविनाशनं ॥ १२५ ॥

अर्थः- त्या सुषुम्ना नाडीचे ठिकाणीं कालरूपी अग्नि नेहमी प्रज्वलीत आहे, तो विषाप्रमाणें कार्यारंभास वर्ज होय; कारण, त्यावर केलेल्या सर्व-कार्यांचा नाश होतो. ॥ १२५ ॥ ॥ ॥ ७ ॥

यदानुक्रममुल्लंघ्य यस्यनाडीद्वयंवहेत् ॥ तदा
तस्यविजानीया-दशुभंनात्रसंशयः ॥ १२६ ॥
क्षणंवामेक्षणंदक्षे विषमंभावमादिशेत् ॥ वि-
परीतंफलंज्ञेयं ज्ञातव्यंचवरानने ॥ १२७ ॥ ॥

अर्थः- जेव्हां क्रमउल्लंघन करून पुरुषाच्या दोन्हीनाडी वहात असतात, तेव्हां त्या मनुष्यास अशुभफल आहे असें जाणावें. आतां ज्याचीनाडी क्षणांत डावीकडे आणि क्षणांत उजवीकडे वाहते त्यासही विषम भाव (संकट) आलें असें जाणावें, त्यास विपरीतफलप्राप्त होतें. १२६,१२७

उभयोरेवसंचारं विषवंतंविदुर्बुधाः ॥ नकुर्या-
त्क्रूरसौम्यानि तत्सर्वंविफलंभवेत् ॥ १२८ ॥

अर्थः- जेव्हां दोन्ही नाडींचा संचार चालू असतो तेव्हां त्यास विषयुक्त, असें ज्ञानी म्हणतात यासाठीं त्या उभयात्मक (सुषुम्ना) स्वरांवर क्रूर व सौम्य दोनप्रकारचीं ही कृत्यें करूनयेत, कारण, तीं निष्फळ होतात. १२८

जीवितेमरणेप्रश्ने लाभालाभेजयाजये ॥ विष-
मेविपरीतेचसंस्मरेज्जगदीश्वरं ॥ १२९ ॥ ईश्व
रेचिंतितेकार्यं योगाभ्यासादिकर्मच ॥ अन्य-
त्तत्रनकर्तव्यं जयलाभसुखैषिभिः ॥ १३० ॥ ॥

अर्थः- जीवित, मरण, प्रश्न, लाभ, अलाभ, जय व पराजय यागोष्टी,

विषम आणि विपरीत स्वर इत्यादि प्रसंगीं करूं नयेत. एक जगदीश्वराचें स्मरण करावें. ॥ १२९ ॥ ईश्वराचें चिंतन करून नंतर योगाभ्यास आदि करून पारमार्थिक कृत्य करावें. जयलाभ व सुख यांची इच्छा करणारे लोकानीं परमार्था शिवाय दुसरें कर्म करूं नये. ॥ १३० ॥ ॥

सूर्येण वह्यमानायां सुषुम्नायां मुहुर्मुहुः ॥ शा-
पं दद्याद्वरं दद्या-त्सर्वथैव तदन्यथा ॥ १३१ ॥

अर्थ:- सूर्यस्वरांत सुषुम्ना नाडी वारंवार वाहत असतां शाप किंवा वर दिला तर सर्व निरर्थक होतो. ॥ १३१ ॥ ॥ ७ ॥

नाडीसंक्रमणे काले तत्त्वसंगमनेऽपि च ॥ शुभं-
किंचिन्न कर्त्तव्यं पुण्यदानानि कोटिधा ॥ १३२ ॥

अर्थ:- नाडीचें संक्रमण होण्याचे वेळेस व तत्त्वांचें संक्रमण (चलन) होतानां दान आदिकरून पुण्यकर्में करावीं दुसरें शुभकर्म करूं नये. १३

विषमस्योदयो यत्र मनसाऽपि न चिंतयेत् ॥ या-
त्रा हानिकरी तस्य मृत्युः क्लेशो न संशयः ॥ १३३ ॥

अर्थ:- ज्यावेळेस विषमस्वराचा उदय असतो, तेव्हां कोणतेंही कार्य मनांत आणूं नये. विषमस्वरावर जो प्रयाण करतो त्यास मृत्यु प्राप्त होतो आणि अनेक क्लेश प्राप्त होतात. यांत संशय नाहीं. ॥ १३३ ॥

पुरो वामोर्ध्वतश्चंद्रो दक्षाधःपृष्ठतो रविः ॥ पूर्ण
रिक्तविवेकोयं ज्ञातव्यो दैशिकैः सदा ॥ १३४ ॥

अर्थ:- पुढें, डावेकडे आणि ऊर्ध्व चंद्र बली होय; व दक्षिणेकडे खालीं आणि पृष्ठभागीं सूर्य बली होय. यावरून विद्वान् लोकांनीं पूर्ण व रिक्त या स्थानांचा विचार करावा. ॥ १३४ ॥ ॥ ७ ॥

ऊर्ध्ववामाग्रतो दूतो ज्ञेयो वामपथि स्थितः ॥ पृष्ठे
दक्षे तथाऽधस्ता-त्सूर्यवाहागतः शुभः ॥ १३५ ॥

अर्थ:- वाम (चंद्र) स्वर वाहत असतां आलेला दूत ऊर्ध्वभागीं, वामभागीं आणि अग्रभागीं आल्यास शुभ जाणावा. तसेंच सूर्यस्वर चालत असतां पृष्ठभागीं व दक्षिणभागीं आणि खालीं आलेला दूत शुभसूचक होय. ॥ १३५ ॥ ॥ ॥ ७ ॥

अनादिर्विषमःसंधि-र्निराहारोनिराकुलः ।। परे
सूक्ष्मेविलीयेत सासंध्यासद्भिरुच्यते ।।१३६।।
नवेदंवेदइत्याहु-र्वेदोवेदोनविद्यते ।। परात्मा
विद्यतेयेन सवेदोवेदउच्यते ।।१३७।। नसंध्या
संधिरित्याहुः संध्यासंधिर्निगद्यते ।। विषमः
संधिगःप्राणः ससंधिस्संधिरुच्यते ।।१३८।।

।। इति नाडीभेदः ।।

अर्थः- अनादि, निष्क्रिय, निश्चल असा जो विषमसंधि (सुषुम्ना) तो परतत्त्व जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं लीन होतो त्यास संध्या असें साधु ह्मणतात. ।।१३६।। प्रसिद्ध वेदास वेद ह्मणत नाहींत, कारण त्याचे ठिकाणीं वेदत्व नाहीं; ज्याच्या योगानें परमात्मा जाणला जातो, त्यासच साधु वेद ह्मणतात. ।।१३७।। तसेंच ब्राह्मण दिवस रात्रि यांचे संधीस संध्या करतात त्या संध्येस साधु संधि असें ह्मणत नाहींत, तर विषमसंधिगत (सुषुम्नानाडींत) असणारा प्राणच संधि होय. ।।१३८।। ।। ३ ।।

।।श्रीदेव्युवाच।।देवदेवमहादेव सर्वसंसारतारक ।।
स्थितंत्वदीयहृदये रहस्यंवदमेप्रभो ।। १३९ ।।

अर्थः- पार्वती ह्मणत्ये; हे देवाधिदेवा शंकरा, तूं या संसारसमुद्रांतून तारणारा आहेस ह्मणून मी विचारतें. आपलें हृदयांत असलेलें रहस्य मला सांगावें. ।। १३९ ।। ।। ः ।। ।। ४ ।।

।।ईश्वरउवाच।।स्वरज्ञानरहस्यात्तु नकाचिद्धेष्टदेवता।।स्वरज्ञानरतोयोगी सयोगीपरमोमतः १४०

अर्थः- शंकर ह्मणतात; हे पार्वती, अत्यंत गोप्य जें स्वरज्ञान या शिवाय दुसरें रहस्य नाहीं हेंच आमचें इष्टदैवत होय. स्वरज्ञानीं रममाण जो योगी तोच श्रेष्ठ योगी होय. ।।१४०।। ।।ः।। ।। ५ ।।

पंचतत्त्वाद्भवेत्सृष्टि-स्तत्त्वेतत्त्वंप्रलीयते ।। पंचतत्त्वंपरंतत्त्वं तत्त्वातीतंनिरंजनं ।। १४१ ।।

अर्थः- पंचतत्त्वांपासून सृष्टि उत्पन्न होते, आणि लयही तत्त्वांतच होतो; याकरितां पंचतत्त्वें हेंच मुख्यतत्त्व होय. निर्गुण जो परमात्मा तो

या पांच तत्त्वांपासून अगदीं निराळा आहे. ॥१५१॥ ॥ ७ ॥

तत्त्वानां नाम विज्ञेयं सिद्धियोगेन योगिनां ॥ भू-
तानां दुष्टचिन्हानि जानातीह स्वरोत्तमः ॥१५२॥

अर्थः- योगीजनानीं सिद्धियोगानें (अभ्यासयोगानें) स्वरांतील तत्त्वें नांव जाणावें. तत्त्वें व स्वर यांचें ज्यास पूर्णज्ञान आहे तो योगी भूतमात्रांचीं दुष्ट चिन्हें सहज जाणतो. ॥१५२॥ ॥ ७ ॥

पृथिव्यापस्तथा तेजो वायुराकाशमेवच ॥ पं-
चभूतात्मकं विश्वं यो जानाति स पूजितः १५३

अर्थः- पृथ्वी, पाणी, तेज, वायु आणि आकाश हीं जीं भूतें तींच पंच तत्त्वें होत. पंचभूतात्मकच हें सर्व जग आहे या पांच तत्त्वांस जो जाणतो तो पूज्य होतो. ॥१५३॥ ॥:॥ ॥ ७ ॥

सर्वलोकस्थजीवानां न देहो भिन्नतत्त्वकः ॥ भू-
लोकात्सत्यपर्यंतं नाडीभेदः पृथक्पृथक् १५४

अर्थः- भूलोकापासून सत्यलोकापर्यंत सर्व लोकांतील जीवांचे देहांतील तत्त्वें भिन्न भिन्न नाहींत; सर्वांत पंचतत्त्वें (पंचभूतें) सारखींच आहेत. परंतु शरीरांतील नाड्या मात्र भिन्न भिन्न आहेत. ॥१५४॥

वामे वा दक्षिणे वाऽपि उदयाः पंच कीर्तिताः ॥ अ-
ष्टधा तत्त्वविज्ञानं शृणु वक्ष्यामि सुंदरि ॥१५५॥

अर्थः- वाम व दक्षिण भागीं उदय पांच तत्त्वांचे पांच आहेत. हे सुंदरी त्या तत्त्वांचें ज्ञान आठ प्रकारानीं तुला सांगतों. ॥१५५॥

प्रथमे तत्त्वसंख्यानं द्वितीये श्वाससंधयः ॥ तृती-
ये स्वरचिन्हानि चतुर्थे स्थानमेवच ॥१५६॥ पं-
चमे तस्य वर्णाश्च षष्ठे तु प्राण एवच ॥ सप्तमे-
स्वादसंयुक्ता अष्टमे गतिलक्षणं ॥ १५७ ॥
एवमष्टविधं प्राणं विषुवंतं चराचरम् ॥ ॥

अर्थः- प्रथम प्रकारांत तत्त्वांची संख्या, दुसऱ्यांत श्वासांच्या संधि, तिसऱ्यांत स्वरचिन्हें, चौथ्यांत स्थान, पांचव्यांत तत्त्वांचे रंग, साहव्यांत प्राण, सातव्यांत स्वाद, आणि आठव्या प्रकारांत गतीचें लक्षण. याप्रमाणें

ठ प्रकारानीं चराचरांत व्यापून राहतो त्याप्राणाचें ज्ञानहोतें. हेपार्वती, या जगांत स्वरतत्त्वज्ञान मुख्य होय त्यावांचून इतर ज्ञान श्रेष्ठ नाहीं १४७

स्वरात्परतरं देवि नान्यथात्वंबुजेक्षणे ॥ १४८॥
निरीक्षितव्यंयत्नेन सदाप्रत्यूषकालतः ॥ का-
लस्यवंचनार्थाय कर्मकुर्वंतियोगिनः ॥ १४९॥

अर्थ:- प्रभातकाला पासून योग्यानें स्वर व त्यांतील तत्त्वांचे उदय मोठ्या दक्षतेनें अवलोकन करावे, कोणतेंही कर्म करीत असतां स्वरोदयांचें अनुसंधान करावें कारण जे स्वरज्ञानी योगी आहेत ते केवळ कालक्षेप करावया साठीं कर्में करतात परंतु त्यांचें लक्ष तत्त्व व स्वर याकडेच असतें ४८-४९.

श्रुत्योरंगुष्ठकौमध्यां-गुल्यौनासापुटद्वये ॥ वद
नप्रांतकेचान्यां-गुलीर्दद्याच्चनेत्रयोः ॥ १५०॥

अर्थ:- तत्त्वज्ञान होण्यासाठीं षण्मुखीमुद्रा करावी, ती अशी- दोन्ही कानांत दोन अंगठे घावे, नाकपुड्यावर दोन्ही मध्यमा ठेवाव्या, नेत्राचे ठिकाणीं व मुखप्रांतावर अन्यअंगुली ठेवाव्या म्हणजे नेत्रावर तर्जनी ठेऊन राहिलेल्या बोटानीं मुखाचे प्रांत झांकावे अशारीतीनें साहा छिद्रें रोधावीं यास षण्मुखी मुद्रा योगी म्हणतात. ॥ १५० ॥ ॥ छ ॥

अस्यांतस्तुपृथिव्यादि-तत्त्वज्ञानंभवेत्क्रमात् ॥
पीतश्वेतारुणश्यामै-र्बिंदुभिर्निरुपाधिकं ॥ १५१

अर्थ:- याच्या आंत पृथिवी आप आदिकरून तत्त्वांचें क्रमानें ज्ञान होतें तें असें कीं वरील षण्मुखी मुद्रा केली असतां पांचरंग दिसतात ते:१ ला पिवळा, २रा पांढरा, ३रा तांबडा, ४था निळा आणि पांचवा चित्रविचित्र असे पांच, त्यांत क्रमानें पृथ्वी पीतवर्ण, आप (पाणी) श्वेतवर्ण, तेज तांबडें, वायु निळा, आणि आकाश हें चित्रवर्णाचें होय असें जाणावें. ॥ १५१ ॥ ॥ ❖ ॥ ॥ छ ॥

दर्पणेनसमालोक्य तत्रश्वासंविनिक्षिपेत् ॥ आ-
कारैस्तुविजानीयात् तत्त्वभेदंविचक्षणः १५२

अर्थ:- श्वास रोधून कांस्याच्या आरशावर सोडावा आणि त्यावर ज्या आकृती दिसतील त्यावरून विचक्षण मनुष्यानें तत्त्वांचा भेद जाणावा. ५२

चतुरस्रंचार्द्धचंद्रं त्रिकोणं वर्त्तुलं स्मृतं ॥ बिंदु-
भिस्तुनभोज्ञेयं आकारैस्तत्त्वलक्षणं ॥१५३॥

अर्थ- चतुष्कोण, अर्द्धचंद्र, त्रिकोण, वर्तुल आणि अनेकबिंदु या आकारां वरून क्रमानें पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं तत्त्वें उदय पावलीं आहेत असें जाणावें. ॥१५३॥ ॥ छ ॥

मध्येपृथ्वीह्यधश्चाप-श्चोर्ध्ववहतिचानलः॥ ति-
र्यग्वायुप्रवाहश्च नभोवहतिसंक्रमे ॥ १५४॥

अर्थ- श्वास वाहतांना नाकपुडीच्या खालीवर कोठेंनलागून मधेंच वाहत असेल तर पृथ्वीतत्त्व, खालच्या भागास झगडून वाहील तर उदक, वरच्या भागास स्पर्श करील तर अग्नि, वाकडा वाहत असल्यास वायु आणि दोनी स्वर बाहेरनयेतां आंत वाहत असल्यास आकाशतत्त्व समजावें. ॥१५४॥

आपः श्वेता क्षितिः पीता रक्तवर्णो हुताशनः॥ मा-
रुतोनीलजीमूत आकाशः सर्ववर्णकः॥१५५॥

अर्थ- उदक शुभ्रवर्ण, पृथ्वी पीत, अग्नि रक्तवर्ण, वायु निळा आणि आकाश चित्रवर्ण होय असें जाणावें. ॥१५५॥ ॥ छ ॥

आतां स्थानपरत्वें तत्त्वज्ञान.

स्कंधद्वये स्थितो वन्हि-र्नाभिमूले प्रभंजनः॥ जा-
नुदेशे क्षितिस्तोयं पादांते मस्तके नभः ॥१५६॥

अर्थ- अग्नि हा दोन्ही स्कंधाचे ठिकाणीं स्थित आहे, वायु नाभिमूळाचे ठायीं, पृथ्वी गुडघ्याचे ठिकाणीं, उदक पायांच्या शेवटीं आणि आकाश हें मस्तकाचे ठिकाणीं राहतें. ॥१५६॥ ॥ छ ॥

आतां स्वादावरून तत्त्वज्ञान प्रकार.

माहेयं मधुरं स्वादं, कषायं जलमेवच ॥ तीक्ष्णं ते-
जः समीरोऽम्लु, आकाशं कटुकं तथा ॥१५७॥

अर्थ- पृथ्वी हें तत्त्व स्वादानें मधुर आहे, पाणी कषाय (तुरट) आहे, तेज तीक्ष्ण, वायु अम्ल (आंबट) आणि आकाश हें कटु आहे. ॥१५७॥

आतां गतीवरून तत्त्वाचें ज्ञान.

अष्टांगुलंवहेद्वायु-रनलश्चतुरंगुलं ॥ द्वादशां

गुलमाहेयं वारुणं षोडशांगुलं ॥ १५८ ॥ ॥

अर्थः- श्वास वाहतांना किती अंगुलें वाहतो हें पाहून त्यावरून तत्त्व जाणावें.- वायु आठ अंगुलें, अग्नि चार अंगुलें, पृथ्वी बारा अंगुलें आणि आपतत्त्व सोळा अंगुलें वाहतें, आकाश हें तेथल्या तेथेंच मोकळें वाहतें.१५८

ऊर्ध्वमृत्युरधः शांतिः, तिर्यगुच्चाटनं तथा ॥ मध्ये स्तंभं विजानीयात्, नभः सर्वत्र मध्यमं ॥ १५९ ॥

अर्थः- अग्नि हा ऊर्ध्व वाहतो तो मृत्युकारक होय, ह्मणून या तत्त्वांत मारणादिक करावें आपतत्त्व खालीं वाहतें तें शांतिकर्मास युक्त होय, पृथ्वी हें मधें वाहते तें स्तंभनास युक्त होय आणि आकाश हें सर्वभागास व्यापून असतें ह्मणजे वर खालीं मधें व वाकडें असें सर्वठिकाणीं आकाश मध्यस्थ जाणावें, यावर कांहीं करूनये. ॥ १५९ ॥ ॥ ७ ॥

पृथिव्यां स्थिरकर्माणि, चरकर्माणि वारुणे, ॥ तेजसि क्रूरकर्माणि, मारणोच्चाटनेऽनिले ॥ १६०

अर्थः- पृथ्वीतत्त्वावर स्थिरकर्में, आपतत्त्वावर चरकर्में, तेजावर क्रूरकर्में आणि वायूवर मारण उच्चाटन इत्यादि कर्में करावीं, ह्मणजे सिद्ध होतात. ॥ १६० ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

व्योम्नि किंचिन्न कर्तव्यमभ्यसेद्योगसेवनं ॥ शून्यता सर्वकार्येषु नात्र कार्या विचारणा ॥ १६१

अर्थः- आकाशतत्त्व चालत असतां कांहीं एक करूनये एक योगाभ्यास मात्र करावा, कारण आकाशतत्त्वावर दुसरें कोणतें ही कार्य केलें असतां त्यांत नाश होतो. ॥ १६१ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

पृथ्वीजलाभ्यां सिद्धिः स्यान्मृत्युर्वह्नौ क्षयोऽनिले, ॥ नभसो निष्फलं सर्वं, ज्ञातव्यं तत्त्ववादिभिः १६२

अर्थः- पृथ्वी आणि जळ हीं तत्त्वें सिद्धिप्रद होत, अग्नि हा मृत्युकारक व वायु क्षय करणारा होय. आणि आकाशतत्त्वावर कोणतें ही कार्य केलें असतां निष्फळ होतें. ॥ १६२ ॥ ॥ ॥ ७ ॥

चिरलाभः क्षितेर्ज्ञेयस्तत्क्षणात्तोयतत्त्वतः ॥ हानिः स्याद्वह्निवाताभ्यां, नभसो निष्फलं भवेत् ॥ १६३

अर्थ- पृथ्वीतत्त्व चिरकाळानें लाभ देणारें आणि उदक तत्क्षणीं लाभ देणा-रे होय; अग्नि व वायु यां तत्त्वांवर हानि आणि आकाशतत्त्वावर सर्व निष्फ-ल होतें. ॥ १६३ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

पीतः शनैर्मध्यवाही हनुर्यावद्गुरुध्वनिः ॥ कवो-
ष्णः पार्थिवो वायुः स्थिरकार्यप्रसाधकः ॥ १६४ ॥

अर्थ- पीतवर्ण, हळूचालणारा, हनुवटी पर्यंत खालींवर नलागतां मध्य स्थितीनें वाहणारा व मोठाशब्द करणारा आणि किंचित् उष्ण असा जो श्वास वायु तो स्थिरकार्य सिद्धि करणारा पार्थिव (पृथ्वीसंबंधि) वायु होय. ६

अधोवाही गुरुध्वानः शीघ्रगः शीतलः स्थितः ॥
यः षोडशांगुलो वायुः स आपः शुभकर्मकृत् १६५

अर्थ- खालीं वाहणारा, मोठाशब्द करणारा, शीघ्रगति, शीतल व सो-ळा अंगुळें ज्याचें परिमाण तो आप (उदकसंबंधि) वायु होय. तो शुभ-कर्माची सिद्धि करणारा होय. ॥ १६५ ॥ ॥ ॥ ७ ॥

आवर्त्तगश्चात्युष्णश्च शोणाभश्चतुरंगुलः ॥ ऊ-
र्ध्ववाही च यः क्रूर कर्मकारी स तैजसः ॥ १६६ ॥

अर्थ- भोंवऱ्याप्रमाणें चालणारा, अतिउष्ण, रक्तवर्ण व चार अंगुलें ऊर्ध्व वाहणारा जो तैजस वायु तो क्रूरकर्मांत सिद्धि देणारा होय. ॥ १६६ ॥ ॥

उष्णः शीतः कृष्णवर्णस्तिर्यग्गाम्यष्टकांगुलः ॥
वायुः पवनसंज्ञस्तु चरकर्मप्रसाधकः ॥ १६७ ॥

अर्थ शीतोष्ण, कृष्णवर्णाचा, वांकडा व आठ अंगुळें वाहणारा जो श्वा-स तो वायुश्वास जाणावा. हा चरकार्यांच्या सिद्धीस युक्त होतो. ॥ १६७ ॥

यः समीरः समरसः सर्वतत्त्वगुणावहः ॥ अंब-
रं तं विजानीयात् योगिनां योगदायकं ॥ १६८ ॥

अर्थ- जो वायु समरस असतो, ज्यांत सर्वतत्त्वांचे गुण मिश्रित असतात तो (आकाशसंबंधी श्वास होय, त्यावर योग्यास योगाची सिद्धि होते. १६८

पीतवर्णं चतुष्कोणं मधुरं मध्यमाश्रितं ॥ भोग-
दं पार्थिवं तत्त्वं प्रवाहे द्वादशांगुलं ॥ १६९ ॥

अर्थ- पृथ्वीतत्त्व रंगानें पिवळें, आकृतीनें चतुष्कोण, चवीनें मधुर, म-

ध्यस्थानीं वाहणारें, परिमाणानें बारा अंगुलें असें आहे तें अनेक उपभोगदा-
यक असें होय. ॥१६९॥ ॥*॥ ॥ ७ ॥

श्वेतमर्धेंदुसंकाशं स्वादेकाषायमार्द्रकं ॥ लाभ-
कृद्वारुणंतत्त्वं प्रवाहेषोडशांगुलं ॥ १७० ॥ ॥

अर्थः- श्वेतवर्ण, अर्ध्या चंद्राच्या आकाराचें तुरट, ओलें आणि प्रवाहीं सो-
ळा अंगुळें, तें वारुण ह्मणजे जलतत्त्व होय; या तत्त्वापासून लाभ होतो.१७०

रक्तंत्रिकोणंतीक्ष्णंच ऊर्ध्वभागप्रवाहकं ॥ दीप्तं-
चतैजसंतत्त्वं प्रवाहेचतुरंगुलं ॥ १७१ ॥ ॥

अर्थः- तेजतत्त्व हें आरक्तवर्ण, त्रिकोण, तिखट ऊर्ध्वभागीं वाहणारें, दे
दीप्यमान आणि प्रवाहांत चार अंगुलें असें आहे. ॥१७१॥ ॥ ७ ॥

नीलंचवर्तुलाकारं स्वादाम्लंतिर्यगाश्रितं ॥ चप-
लंमारुतंतत्त्वं प्रवाहेऽष्टांगुलंस्मृतं ॥ १७२ ॥

अर्थः- वायुतत्त्व हें निळें, आकारानें वर्तुल, स्वादानें अम्ल, वांकडें जा-
णारें, चपल आणि आठ अंगुलें वाहणारें होय. ॥१७२॥ ॥

वर्णाकारेस्वादवाहे अव्यक्तंसर्वगामिनं ॥ मो-
क्षदंनाभसंतत्त्वं सर्वकार्येषुनिष्फलं ॥ १७३ ॥

अर्थः- वर्ण, आकार, स्वाद व वाहण्याची गति या चारी प्रकारानीं अ-
स्पष्ट जें आकाशतत्त्व तें सर्व प्रवृत्तिकार्यांस निष्फळ करणारें होय. एक मो-
क्ष कृत्यास मात्र हें साधक होतें. ॥१७३॥ ॥ ॥ ७ ॥

पृथ्वीजलेशुभेतत्त्वे, तेजोमिश्रफलोदयं,॥ हानि
मृत्युकरौपुंसा-मशुभौव्योममारुतौ ॥ १७४ ॥

अर्थः- पृथ्वी आणि जल हीं तत्त्वें शुभ होत, तेज मिश्र (मध्यफळ) होय
वायु आणि आकाश हीं तत्त्वें हानि व मृत्यु करणारीं पुरुषानां अत्यंत अशु-
भ होत. ॥१७४॥ ॥*॥ ॥ ७

आपूर्वेपश्चिमेपृथ्वी, तेजश्चदक्षिणेतथा,॥ वा-
युश्चोत्तरदिग्ज्ञेया मध्येकोणगतंनभः ॥१७५॥

अर्थः- पूर्वेपासून, पश्चिमे पर्यंत पृथ्वी [illegible] दक्षिणेस तेज तशी अग्नी
स वायुतत्त्व आणि मध्य दिशेस आकाश [illegible] जलेंतथा ॥ ७ ॥ ॥

पून राहतात. ॥ १७५ ॥ ॥ ॥ ॥

चंद्रेपृथ्वीजलेस्यातां सूर्येऽग्निर्यदाभवेत् ॥ त-
दासिद्धिर्नसंदेहः सौम्यासौम्येषुकर्मसु ॥ १७६ ॥

अर्थ- चंद्रस्वरांत पृथ्वी व जल, आणि सूर्यस्वरांत अग्नि हीं तत्वें चालू असतात, तेव्हां क्रमानें सौम्य व क्रूर कार्याचेठायीं सिद्धि होते, यांत संशय नाहीं.

लाभःपृथ्वीकृतोऽन्हिस्या-न्निशायांलाभकृज्जलं ॥
वन्हौमृत्युः क्षयोवायु-र्नभःस्थानंदहेत्क्वचित् ॥ १७७ ॥

अर्थ- पृथ्वीतत्वावरून लाभ होणारा दिवस होतो, जलतत्व रात्रीं लाभदायक होय, अग्नितत्वावर मृत्यु, वायुतत्वावर क्षय आणि आकाशतत्वावर स्थानदाह होतो. ॥ १७७ ॥ ॥ ॥ ॥

जीवितव्येजयेलाभे कृष्यांचधनकर्मणि ॥ मंत्रा-
र्थे युद्धप्रश्नेच गमनागमनेतथा ॥ १७८ ॥ ॥

अर्थ- जीवित, जय, लाभ, कृषि, धनकर्म, मंत्रार्थ, युद्धकर्म, प्रश्न, गमन व आगमन इत्यादि कर्मांचेठायीं पृथ्वीतत्व शुभ होय. ॥ १७८ ॥ ॥

आयातिवारुणेतत्वे शत्रुरस्तिशुभं क्षितौ ॥ प्र-
यातिवायुतोऽन्यत्र हानिमृत्यूनभोऽनले ॥ १७९ ॥

अर्थ- शत्रु आला असतां पृथ्वी व आप हीं तत्वें शुभकारक होत, वायुतत्वावर शत्रु आल्यास दुसरीकडे जातो, आकाश व अग्नि या तत्वावर शत्रु आल्यास हानि व मृत्युदायक होय. ॥ १७९ ॥ ॥ ॥

पृथिव्यांमूलचिंतास्या-ज्जीवस्यजलवातयोः ॥
तेजसाधातुचिंतास्याच्छून्यमाकाशतोवदेत् १८०

अर्थ- कोणी पृच्छक पुसावयास आला तर त्याच्या मनांतील चिंता तत्वावरून पाहावी:- पृथ्वीतत्वावर मूलचिंता ( वृक्षादिकांची चिंता ) आहे, आप आणि वायुतत्वावर जीवचिंता व तेजतत्वावर धातुचिंता आहे व आकाशतत्वावर शून्य ह्मणजे कांहीं चिंता नाहीं. ॥ १८० ॥ ॥ ॥

पृथिव्यांबहुपादाःस्यु-र्द्विपदस्तोयवायुतः ॥ तेज-
स्येचतुष्पात्स्या-न्नभसापादवर्जितः ॥ १८१ ॥ ॥

अर्थ- पृथ्वीतत्व रंगानें पिवळें यांनी ( पुष्कळसोबत्यांबरोबर ) गमन क

रावें; पाणी आणि वायु या तत्त्वावर दोनपायानीं (एकद्यानें) जावें; तेजतत्त्वावर च्यारपायानीं (दोघानीं) जावें, आकाशतत्त्वावर मुळीं कोठें कोणीं जाऊं नये. ॥१८१॥ ॥ ❁ ॥ ॥ ७ ॥

कुजोवन्ही,रविः पृथ्वी, सौरिरापःप्रकीर्तितः॥ वा-
युस्थानस्थितो राहु-र्दक्षरंध्रप्रवाहकः ॥१८२॥

अर्थः- दक्षिणनाडी वाहत असतां अग्नितत्त्व वाहतें तो मंगळ, पृथ्वीतत्त्व तो सूर्य, उदक तो शनि आणि वायुतो राहू जाणावा. ॥१८२॥ ॥

जलंचंद्रो,बुधःपृथ्वी, गुरुर्वातः,सितोऽनलः,॥ वाम-
नाड्यांस्थिताःसर्वे सर्वकार्येषुनिश्चिताः॥१८३॥

अर्थः- वामनाडींत (इडेंत) जलतत्त्व तो चंद्र, पृथ्वीतत्त्वतो बुध, वायुतो गुरु आणि अग्नितत्त्वतो शुक्र होय, हे ग्रह चंद्रस्वरांतील सर्वकार्यास शुभ होत. ॥१८३॥ ॥ ❁ ॥ ॥ ७ ॥

पृथ्वीबुधोजलादिंदुः, शुक्रोवन्हीरविःकुजः॥ वा-
यूराहुशनी,व्योम गुरुरेवप्रकीर्तितः॥१८४॥

अर्थः- "सुषुम्नानाडींत" पृथ्वीतत्त्व तो बुध, जल तें चंद्र शुक्र, अग्नितत्त्व ते रवि मंगळ, वायुतत्त्व ते राहु शनि, आणि आकाश तत्त्वतो गुरु असें म्हणतात. ॥१८४॥ ॥ ❁ ॥ ॥ ७ ॥

प्रवासप्रश्नआदित्ये यदिराहु-र्गतोऽनिले॥ तदा-
सोचलितोज्ञेयः स्थानांतरमपेक्षते ॥१८५॥

अर्थः- सूर्यस्वरांवर कोणी प्रवासाहून येण्याविषयीं प्रश्नकेला आणि त्यावेळेस श्वासांत राहूग्रह असेल तर प्रवासी स्थानांतराहून निघाला असें जाणावें. ॥१८५॥ ॥ ❁ ॥ ॥ ७ ॥

आयातिवारुणे तत्त्वे, तत्रैवास्ति शुभंक्षितौ,॥ प्र-
वासी पवनेऽन्यत्र, मृत्युरेवानले भवेत्॥१८६॥

अर्थः- उदकतत्त्वावरप्रश्न केल्यास लवकर येतो, पृथ्वीतत्त्वावर वि-[illegible]ल्यास जेथें गेला असेल तेथेंच सुखी आहे, वायुतत्त्वावर प्रवासी [illegible] स्थानीं गेला आणि अग्नितत्त्वावर मृत्यु प्राप्त झाला असें जाण[illegible] ॥

पार्थिवेमूलविज्ञानं शुभंकार्यंजलेतथा ॥३

येधातुविज्ञानं व्योम्नि शून्यं विनिर्दिशेत् ॥ १८७ ॥

अर्थः- पृथ्वीतत्त्वावर मूलविज्ञान (वृक्षज्ञान) जलतत्त्वावर शुभकार्य, अ[illegible] तत्त्वावर धातुज्ञान व आकाशतत्त्वावर शून्य जाणावें. ॥ १८७ ॥

तुष्टिःपुष्टीरतिःक्रीडा जयहर्षौधराजले ॥ तेजोवा-
य्वोश्चसुप्तांक्षो ज्वरकंपःप्रवासिनः ॥ १८८ ॥

अर्थः- पृथ्वी व उदक यातत्त्वांवर कोणी प्रवाशाविषयीं प्रश्न करील तर [illegible] वासी संतोष, पुष्टता, प्रीती व क्रीडा यानीं युक्त आहे, तेज व वायु यांवर [illegible] सल्यास तो क्रमानें निद्रेंत व ज्वरित आहे असें जाणावें. ॥ १८८ ॥

गतायुर्मृत्युराकाशे तत्त्वस्थाने प्रकीर्त्तिताः ॥ द्वा-
दशैताःप्रयत्नेन ज्ञातव्या दैविकैः सदा ॥ १८९ ॥

अर्थः- आकाशतत्त्वावर प्रश्न केल्यास मृत्यु जाणावा. याप्रमाणें बारा प्र[illegible] त्वें दैवज्ञानीं प्रयत्नानें जाणावींत. ॥ १८९ ॥ ॥ ७

पूर्वायां पश्चिमे याम्ये उत्तरस्यां यथाक्रमं ॥ पृथि-
व्यादीनि भूतानि बलिष्ठानि विनिर्दिशेत् ॥ १९० ॥

अर्थः- पृथिवी, आप, तेज, आणि वायु हीं तत्त्वें पूर्व, पश्चिम, दक्षिण [illegible] णि उत्तर या दिशांस क्रमें करून बलिष्ठ होत. ॥ १९० ॥ ॥ ७

पृथिव्यापस्तथा तेजो वायुराकाशमेवच ॥ पंच-
भूतात्मको देहो ज्ञातव्यश्चवरानने ॥ १९१ ॥ ॥

अर्थः- हे सुंदरि, पृथिवी, पाणी, तेज, वायु आणि आकाश या पंच[illegible] पासून हा देह उत्पन्न झाला आहे ह्मणून पंचभूतात्मक आहे असें जा[illegible] वें. ॥ १९१ ॥ ॥ ❀ ॥ ॥ ७

अस्थिमांसं त्वचा नाडी रोमचैवतुपंचमं ॥ पृथ्वी
पंचगुणा प्रोक्ता ब्रह्मज्ञानेनभाषितं ॥ १९२ ॥

अर्थः- हाडें, मांस, त्वचा, नाडी आणि रोम हे पांच पृथ्वीचे गुण हो[illegible] शांत शास्त्रांत सांगितलें आहे. ॥ १९२ ॥ ॥ ७

शुक्रशोणितमज्जाश्च मूत्रं लालंचपंचमं ॥ आ-
पंचगुणाः प्रोक्ता ब्रह्मज्ञानेनभाषितं ॥ १९३ ॥

अर्थः- पृथ्वीत... रक्त, मज्जा, मूत्र आणि लाळ हे उदकाचे पांच गुण होत.

क्षुधातृषातथानिद्रा कांतिरालस्यमेवच ॥ तेजः
पंचगुणंप्रोक्तं ब्रह्मज्ञानेनभाषितं ॥ १९४ ॥

अर्थः- क्षुधा, तृषा, निद्रा, कांति व आलस्य हे पांच तेजोगुण होत. १९४

धावनंचलनंग्रंथः संकोचनप्रसारणे ॥ वायोःपं
चगुणाःप्रोक्ताः ब्रह्मज्ञानेनभाषितं ॥१९५॥

अर्थः- धांवणें, चलन, गुंफणें, आखडणें, आणि पसरणें हे वायूचे पांच गुण जाणावे. ॥१९५॥ ॥ः॥ ॥ छ ॥

रागद्वेषौतथालज्जा भयंमोहश्चपंचमः ॥ न-
भःपंचगुणंप्रोक्तं ब्रह्मज्ञानेनभाषितं ॥ १९६ ॥

अर्थः- राग (प्रीति) द्वेष, लज्जा, भय आणि मोह हे आकाशाचे पांच गुण होत. ॥१९६॥ ॥ ❖ ॥ ॥ छ ॥

पृथ्व्याःपलानिपंचाशत् चत्वारिंशत्तथांऽभसः ॥ अ-
ग्नेस्त्रिंशत्पुनर्वायो-र्विंशतिर्नभसोदश ॥१९७॥

अर्थः- पृथ्वी ५० पळें, उदक ४० पळें, अग्नि ३० पळें, वायु २० पळें, आणि आकाश १० पळें वाहतें; याप्रमाणें पांच तत्वें २॥ घटिकांत वहातात. ॥१९७॥॥

पृथिव्यांचिरकालेन लाभश्चापःक्षणात्भवेत्॥
जायतेपवनेस्वल्पः सिद्धोऽप्यग्नौविनश्यति १९८

अर्थः- पृथ्वीतत्वावर चिरकालानें लाभ होतो, उदकतत्वावर तत्क्षणीं होतो, वायुतत्वावर स्वल्पलाभ होतो; अग्नितत्वावर लाभ सिद्ध झाला असला तरी नाहींसा होतो. ॥ १९८॥ ॥ः॥ ॥ छ ॥

पृथ्व्याःपंचह्यपांवेदा गुणास्तेजोद्विवायुतः ॥ न-
भस्येकगुणश्चैव तत्वज्ञानमिदंभवेत् ॥१९९॥

अर्थः- पृथ्वी पंचगुणात्मक, उदक चतुर्गुण, तेज त्रिगुणात्मक, वायूंत दोनगुण आणि आकाशांत एकगुण जाणावा॥ १९९ ॥ ॥ः॥ ॥ छ ॥

फूत्कारकृत्प्रस्फुटिता विदीर्णापतिताधरा ॥ ददा-
तिसर्वकार्येषु अवस्थासदृशंफलं ॥ २०० ॥॥

अर्थः- फूत्कारकरणारी, फुटलेली, विदीर्ण झालेली आणि पडलेली अशी पृथ्वी सर्वकार्यांत आपल्या अवस्थेप्रमाणें फळदेते. ॥ २०० ॥ ॥

धनिष्ठारोहिणीज्येष्ठाऽनुराधाश्रवणंतथा ॥ अ-
भिजिदुत्तराषाढा पृथ्वीतत्त्वमुदाहृतं ॥ २०१ ॥

अर्थः- धनिष्ठा, रोहिणी, ज्येष्ठा, अनुराधा, श्रवण, अभिजित्, उत्तराषाढा हीं नक्षत्रें पृथ्वीतत्त्वांतील जाणावींत. ॥ २०१ ॥ ॥ छ ॥

पूर्वाषाढातथाऽश्लेषा मूलमार्द्राचरेवती ॥ उत्त-
राभाद्रपदेतोयं तत्त्वंशतभिषक्प्रिये ॥ २०२ ॥

अर्थः- पूर्वाषाढा, आश्लेषा, सूल, आर्द्रा, रेवति उत्तराभाद्रपदा आणि शततारका या नक्षत्रावर उदकतत्त्व जाणावें. ॥ २०२ ॥ ॥ छ ॥

भरणीकृत्तिकापुष्यौ मघापूर्वाचफाल्गुनी ॥ पू-
र्वाभाद्रपदास्वाती तेजस्तत्त्वमितिप्रिये ॥ २०३ ॥

अर्थः- भरणी, कृत्तिका, पुष्य, मघा, पूर्वा, पूर्वाभाद्रपदा आणि स्वातिहें तेजतत्त्वजाणावें. ॥ २०३ ॥ ॥ ※ ॥ ॥ छ ॥

विशाखोत्तरफाल्गुन्यौ हस्तचित्रेपुनर्वसु ॥ अ-
श्विनीमृगशीर्षेच वायुतत्त्वमुदाहृतं ॥ २०४ ॥

अर्थः- विशाखा, उत्तरा, हस्त, चित्रा, पुनर्वसु, अश्विनी व मृग हें वायुतत्त्व होय. ॥ २०४ ॥ ॥ ⁘ ॥ ॥ छ ॥

वहन्नाडीस्थितोदूतो यत्पृच्छतिशुभाशुभं ॥ त
त्सर्वसिद्धिमाप्नोति शून्येशून्यंनसंशयः ॥ २०५ ॥

अर्थः- वाहते नाडीचे भागीं उभाराहून जो प्रश्नकरील त्याच्या प्रश्नांतील शुभाशुभकार्य सर्व सिद्धीस जातें आणि शून्यनाडीवर प्रश्न करणाराचें कार्य शून्य होतें असें जाणावें. ॥ २०५ ॥ ॥ ॥ छ ॥

पूर्णेऽपिनिर्गमश्वासे सुतत्त्वेऽपिनसिद्धिदः ॥ सू-
र्यश्चंद्रोऽथवानृणां-संग्रहेसर्वसिद्धिदः ॥ २०६ ॥

अर्थः- पूर्णश्वास व शुभतत्त्वाचा उदय असूनही जर निर्गमाचेवेळेस (सोडतानां) कोणी कांहीं प्रश्न करील तर तें कार्य सिद्धीस जाणार नाहीं; याप्रमाणेंच चंद्र किंवा सूर्यस्वर असतां पूरकांत सर्वसिद्धि होते. ॥ २०६ ॥ ॥

तत्त्वेरामोजयंप्राप्तः सुतत्त्वेचधनंजयः ॥ कौर-
वा निहताःसर्वे युद्धेतत्त्वविपर्ययात् ॥ २०७ ॥

अर्थ- राम हा तत्त्वबळानें जय पावला, तसाच अर्जुन ही तत्त्वाच्या योगानें जय पावला आणि कौरव हे तत्त्वाच्या वैपरीत्यामुळें नाश पावले. ॥ २०७ ॥ ॥

जन्मांतरीयसंस्कारा-त्प्रसादादथवागुरोः ॥ केषांचिज्जायते तत्त्व-वासना विमलात्मनां ॥ २०८

अर्थ- जन्मांतरींच्या संस्कारानें अथवा गुरूच्या कृपेनें स्वच्छमनाचे विरळ लोकास तत्त्वज्ञान प्राप्त होतें. ॥ २०८ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

लंबीजंधरणींध्याये-च्चतुरस्रांसुपीतभां ॥ सुगंधंस्वर्णवर्णाभां प्राप्नुयाद्देहलाघवं ॥ २०९ ॥

अर्थ- लं हें पृथ्वीतत्त्वाचें बीज होय, हें तत्त्व आकृतीनें चतुष्कोण, सोन्याप्रमाणें पीतवर्ण व सुगंधयुक्त आहे; या तत्त्वाचें ध्यान करणारास सुगंध, सुवर्णाप्रमाणें कांति व देहाचे ठिकाणीं लघुत्व प्राप्त होतें. ॥ २०९ ॥ ॥

वंबीजंवारुणंध्यायेत् तत्त्वमर्द्धशशिप्रभं ॥ क्षुत्तृष्णा द्विसहिष्णुत्वं जलमध्येचमज्जनं ॥ २१० ॥

अर्थ- जलतत्त्वाचें बीज वं हें होय, त्याचा आकार अर्द्धचंद्राप्रमाणें जाणावा या तत्त्वाचें ध्यान करणारास क्षुधा व तृषा सहन होतें व पाण्यांत बुडणें हें साध्य होतें. ॥ २१० ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

रंबीज मग्निजंध्याये-त्त्रिकोणमरुणप्रभं ॥ बह्वन्नपानभोक्तृत्वं आतपाग्निसहिष्णुता ॥ २११ ॥

अर्थ- अग्नीचें "रं" हें बीज होय, अग्नितत्त्वाची आकृती त्रिकोण, रंग आरक्त होय, या तत्त्वाचें ध्यान करणारास पुष्कळ अन्न पान प्राप्त होतें व ऊन आणि अग्नि यांचा तापसहन होतो. ॥ २११ ॥ ॥ छ ॥

यंबीजंपवनंध्याये-द्वर्तुलंश्यामलप्रभं ॥ आकाशगमनाद्यंच पक्षिवद्गमनंतथा ॥ २१२ ॥ ॥

अर्थ- वायुतत्त्वाचें बीज "यं" हें होय, आकारानें वर्तुल, वर्णानें निळें, अशा वायुतत्त्वाचें ध्यान करणारास आकाशाचा सिद्धि, पक्ष्याप्रमाणें उड्डाण करणें हें प्राप्त होतें. ॥ २१२ ॥ ...कल्यास आकार ॥ छ ॥

हंबीजंगगनंध्या... ॥ २२५ ॥ ॥ ॥ ज्ञानं त्रिकालविषयं नयमेनिधयोनय ॥ ...॥ २१३ ॥

अर्थः- आकाश तत्त्वाचें "हं" हें बीज होय; हें तत्त्व निराकार व अनेक वर्णात्मक आहे, याचें ध्यान करणारास त्रिकालज्ञान आणि अणिमादि आठ सिद्धि प्राप्त होतात, असें जाणावें. ॥ २१३ ॥ ॥ ९ ॥

स्वरज्ञानीनरोयत्र धनंनास्तिततःपरं ॥ गम्यते स्वरज्ञानेन अनायासंफलंभवेत् ॥ २१४ ॥

अर्थः- स्वरज्ञानासारखें धन दुसरें नाहीं, स्वरज्ञानावर मनुष्य कोणतेंही कार्यास गेला तरी आयास न होतां फलप्राप्ती होते. ॥ २१४ ॥ ॥

॥ श्रीदेव्युवाच ॥ देवदेवमहादेव महाज्ञानंस्वरोदयं ॥ त्रिकालविषयंचैव कथंभवतिशंकर २१५

अर्थः- देवी ह्मणते, हे देवाधिदेवा शंकरा; स्वरापासून त्रिकालज्ञान कसें होतें हें मला कथन करावें. ॥ २१५ ॥ ॥ ९ ॥

॥ ईश्वरउवाच ॥ अर्थकालजयप्रश्न-शुभाशुभमितित्रिधा ॥ एतत्त्रिकालविज्ञानं नान्यद्भवतिसुंदरि १६

अर्थः- शंकर ह्मणतात हे देवि, भूत भविष्य वर्त्तमान या तीन काळांत जयादिक शुभ आणि अशुभ (पराजयादिक) याचें ज्ञान स्वरोदयाच्या ज्ञानानेंच होते, यास अन्य उपाय नाहीं. ॥ २१६ ॥ ॥

तत्त्वेशुभाशुभंकार्यं तत्त्वेजयपराजयौ ॥ तत्त्वेसुभिक्षदुर्भिक्षे तत्त्वेत्रिपदमुच्यते ॥ २१७ ॥ ॥

अर्थः- तत्त्वावरच शुभाशुभकार्य, जयपराजय, सुभिक्ष, दुर्भिक्ष होतात. तत्त्व हें त्रिपद (कालत्रयाश्रय) आहे, असें ज्ञानीपुरुष ह्मणतात. ॥ २१७ ॥

॥ श्रीदेव्युवाच ॥ देवदेवमहादेवसर्वसंसारसागरे ॥ किंनराणांपरंमित्रंसर्वकार्यार्थसाधकं २१८

अर्थः- देवी ह्मणते, हे देवाधिदेवा; या संसारसमुद्रांत मनुष्यांनां सर्वकार्यांची सिद्धि करणारा मित्र कोण हें मला सांगावें. ॥ २१८ ॥ ॥

॥ ईश्वरउवाच ॥ प्र[illegible] सिनां पूरकात परंमित्रं प्राणएवपरःसखा ॥ प्राणतुल्य अर्धप्राप्तः सुतत्त्वेच नास्तिवरानने २१९

अर्थः- महादेव ह्म[illegible] ताःसर्वे शुद्धेतत्त्वविप मात्रास प्राण हाच मुख्यमित्र व सखा (सहाय[illegible] अन्य नाहीं. ॥ २१९ ॥ ॥

॥श्रीदेव्युवाच॥कथंप्राणस्थितोवायु-र्देहःकिंप्राणरू-
पकः॥तत्त्वेषुसंचरन्प्राणो ज्ञायतेयोगिभिःकथं २०

अर्थ- देवी प्रश्नकरते, हे शंकरा; वायु प्राणाचेठिकाणीं कसा राहतो? देह प्राण रूप कसा आहे? आणि तत्त्वांचेठायीं संचार करणारा जो प्राण त्यास योगीकसें जाणतात? हें मला सांगावें. ॥ २२० ॥ ॥ ७ ॥

॥श्रीशिवउवाच॥कायानगरमध्यस्थो मारुतोरक्ष-
पालकः॥प्रवेशेदशभिःप्रोक्तो निर्गमेद्वादशांगुलः२१

अर्थ- शंकर सांगतात, शरीर हेंच कोणीएक नगर यांत वायु रक्षक होय तो प्रवेशकाळीं १० अंगुळें आणि निघतानां १२ अंगुळें वाहतो. ॥२२१॥

गमनेतुचतुर्विंश-न्नेत्रवेदास्तु धावने ॥ मैथुने
पंचषष्टीश्च शयनेचशतांगुलं ॥ २२२ ॥ ॥

अर्थ- गमनकाळीं २४अंगुळें, धांवतानां ४२अंगुळें, मैथुनकाळीं ६५ आणि निद्रेंत १०० अंगुळें प्राणाची गती होते. ॥२२२॥ ॥ ७ ॥

प्राणस्यतुगतिर्देवि स्वभावाद्द्वादशांगुलं ॥भो-
जनेवचनेचैव गतिरष्टादशांगुलं॥ २२३ ॥

अर्थ- प्राणाची स्वाभाविक गति १२ अंगुळें जाणावी, परंतु भोजनाचेवेळेस व बोलतानां १८ अंगुळें गति होते. ॥२२३॥ ॥ ७ ॥

एकांगुलंकृतेन्यूने प्राणे निष्कामता मता ॥आ-
नंदस्तुद्वितीयेस्या-त्कविशक्तिस्तृतीयके २२४
वाचासिद्धिश्चतुर्थेच दूरदृष्टिस्तुपंचमे॥ षष्ठे-
त्वाकाशगमनं चंडवेगश्चसप्तमे॥ २२५ ॥

अर्थ- प्राणाची गति १२ अंगुळें ह्मणून सांगितलें आहे त्यापैकीं एकअंगुलगति योगाभ्यासानें कमी केल्यास निष्कामता प्राप्त होते, दुसरें अंगुल कमी केलें ह्मणजे आनंद होतो, तिसरें अंगुल कमी केल्यास कविशक्ति प्राप्त होते, चौथें अंगुल जिंकल्यास वाचासिद्धि होते, पांचवें न्यून केल्यास दूरदृष्टि प्राप्त होते, सहावें जिंकल्यास आकाशगमन आणि सातवें जिंकल्यास प्रचंडवेग प्राप्त होतो. ॥ २२५ ॥ ॥ ॥ ७ ॥

अष्टमेसिद्धयश्चैव नवमेनिधयोनव ॥ दशमे

दशमूर्त्तिश्च च्छायानैकादशो भवेत् ॥२२६॥
द्वादशे हंसचारश्च गंगामृतरसं पिबेत् ॥ आन-
खाग्रंप्राणपूर्णे कस्यभक्ष्यं च भोजनं ॥२२७॥

अर्थ- आठवें अंगुल जिंकल्यास सिद्धि, नववें अंगुल जिंकल्यास नवनिधि प्राप्त होतात, दाहवें अंगुल जिंकिलें ह्मणजे दशमूर्त्तित्व ( अनेकरूपें ) होतें, अकरा अंगुलें जिंकल्यास साउली नाहींशी होते, आणि बारा अंगुलें जिंकिलें असतां हंसगति व गंगामृताचें प्राशन होतें यापमाणें प्राणाची गति १२ अंगुलें जिंकिली ह्मणजे तो वायु नखशिखाग्रपर्यंत पूर्ण होतो; सगळा स अमृतपान होत असल्यामुळें खाणें पिणें याची गरज रहातनाहीं. ॥२२७॥

एवंप्राणविधिः प्रोक्तः सर्वकार्यफलप्रदः ॥ ज्ञाय-
तेगुरुवाक्येन न विद्याशास्त्रकोटिभिः ॥२२८॥

अर्थ- याप्रमाणें सर्वकार्यांत फलप्रद असा हा प्राणविधि सांगितला प्राण गतीचा रोधकरण्याचा प्रकार गुरुवाक्यानें समजतो, गुरुशिवाय विद्या व कोट्यावधि शास्त्रें यांनीं समजत नाहीं. ॥ २२८ ॥ ॥ ७ ॥

प्रातश्चंद्रो रविः सायं यदिदैवान्नलभ्यते ॥ मध्या-
न्हात्मध्यरात्राच्चपरतस्तुप्रवर्त्तते ॥ २२९ ॥ ॥

अर्थ- प्रातःकालीं चंद्र आणि सायंकाळीं सूर्य असावा ह्मणजे उत्तम ह्म; प्रारब्धयोगानें तसें नझाल्यास मध्यान्ह व मध्यरात्र यावेळेस नेक्र मानें प्रवृत्त झाले असतां ते शुभ होत. ॥ २२९ ॥ ॥ ७ ॥

दूरयुद्धेजयीचंद्रः समासन्नेदिवाकरः ॥ वह-
न्नाड्यागतःपादः सर्वसिद्धिप्रदायकः ॥२३०॥

अर्थ- दूरयुद्ध कर्त्तव्य असतां चंद्र विजयी होय आणि निकटयुद्धांत सूर्य जयप्रद जाणावा. वाहते नाडीचा पाय प्रथम टाकला असतां सर्वसिद्धि करणारा होतो. ॥ २३० ॥ ॥ ❋ ॥ ॥ ७ ॥

यात्रारंभेविवाहेच प्रवेशेनगरादिके ॥ शुभ-
कार्याणिसिध्यंति चंद्रचारेषुसर्वदा ॥२३१॥

अर्थ- प्रयाण, लग्न, नगरादिकांत प्रवेश, इत्यादि शुभकार्यें चंद्रस्वरा सर्वकाळ सिद्धिप्रद होतात. ॥ २३१ ॥ ॥ ❋ ॥ ॥ ७ ॥

१ अयनतिथिदिनेशैः स्वीयतत्त्वेचयुक्ते यदिवहति कदाचिद्दैवयोगेनपुंसां ॥ सजयतिरिपुसैन्यंस्तंभ मात्रस्वरेण प्रभवतिनचविघ्नंकेशवस्यापिलोके ॥२३२

अर्थ- अयन, तिथी व वार यांच्यास्वामीनींयुक्त आपला स्वर व तत्त्व वाहत असतां जो युद्धकरतो तो स्वराचें स्तंभन मात्रेंकरून शत्रूस जिंकतो, त्यास वैकुंठलोकांतही विघ्न होत नाहीं. ॥ २३२ ॥ ॥ छ ॥

जीवंरक्षजीवंरक्ष जीवांगेपरिधायच ॥ जीवीजपतियोयुद्धे जीवनूजयतिमेदिनीं ॥ २३३ ॥

अर्थ- जीवांगाचे ठिकाणीं वस्त्र परिधान करून "जीवंरक्ष जीवंरक्ष" या प्रमाणें जो जपकरतो तो युद्धांत जीवंत राहून सर्व पृथ्वीस जिंकतो. ॥ २३३ ॥

भूमौजलेचकर्त्तव्यं गमनंशांतिकर्मसु ॥ वन्हौ वायौप्रदीप्तेषु खेपुनर्नोभयेष्वपि ॥ २३४ ॥

अर्थ- भूमि आणि जल या तत्त्वांवर शांतकर्माविषयीं गमन करावें. अग्नि व वायु या तत्त्वांवर दीप्त (उग्र) कर्मास गमन करावें आणि आकाशतत्त्वावर दोन्हीकर्मांस जाऊंनये. ॥ २३४ ॥ ॥ छ ॥

जीवेनशस्त्रंबध्नीयात् जीवेनैवविकाशयेत् ॥ जीवेनप्रक्षिपेच्छस्त्रं युद्धेजयतिसर्वदा ॥ २३५ ॥

अर्थ- जीवानें (जिकडची नाडी वाहतें त्या हातानें) शस्त्र बांधावें, त्याच हातानें प्रकाशित करावें आणि जीवंत हातानेंच शस्त्र टाकावें; असें केल्यानें नेहमी जय प्राप्त होतो. ॥ २३५ ॥ ॥ ॥ छ ॥

आकृष्यप्राणपवनं समारोहेतवाहनं ॥ समुत्तरेपदंदद्यात्सर्वकार्याणिसाधयेत् ॥ २३६ ॥

अर्थ- वहनावर चढतानां प्राणवायु आकर्षण करावा आणि अश्वाचे डाव्याभागीं पाय देऊन चढावें म्हणजे सर्वकार्यांची सिद्धि होते. ॥ २३६ ॥

अपूर्णेशत्रुसामग्री पूर्णेवास्वबलंतथा ॥ कुरुतेपूर्णतत्त्वस्थो जयत्येकोवसुंधरां ॥ २३७ ॥

अर्थ- अपूर्ण (रिक्त) अंगाकडे शत्रूची सामग्री आणि पूर्ण अंगाकडे आपलें सैन्य करून पूर्णतत्त्वावर जो युद्धकरतो तो एकटा सर्व पृथ्वीस जिंकतो २३७

यानाडीवहतेचांगे तस्यामेवाधिदेवता ॥ स-
न्मुखेऽपिदिशातेषां सर्वकार्यफलप्रदा ॥ ३८ ॥

अर्थ:- शरीरांत जी नाडी वाहते त्या नाडीचे ठिकाणीं देवता असते. तेंच अं
ग सन्मुख दिशेस करावें, ह्मणजे सर्व कार्याची सिद्धि होते. ॥ २३८ ॥ ॥

आदौतुक्रियतेमुद्रा पश्चाद्युद्धंसमाचरेत् ॥ स-
र्पमुद्राकृतायेन तस्यसिद्धिर्नसंशयः ॥ २३९ ॥

अर्थ:- आधीं मुद्रा करून नंतर युद्ध करावें. ज्यानें सर्पमुद्रा केली त्यास नि-
संशय सिद्धि होते. ॥ २३९ ॥ ॥ ❖ ॥ ॥ ७ ॥

चंद्रप्रवाहेऽप्यथसूर्यवाहे भटाःसमायांतिचयोद्धुका
माः ॥ समीरणस्तत्त्वविदांप्रतीतो याशून्यतासा
प्रतिकार्यनाशं ॥ २४० ॥

अर्थ:- चंद्र किंवा सूर्य कोणता ही स्वर वाहत असतां युद्ध करण्याचे इ-
च्छेनें जे वीर येतात, ते जर शून्यस्थानीं उभेराहतील तर कार्यनाश (प-
राजयोपावतील. आणि पूर्णस्थानीं उभेराहतील तर जय पावतील;
असें स्वर तत्त्ववेत्यानें जाणावें.) ॥ २४० ॥ ॥ ॥ ७ ॥

यां दिशावहतेवायु-र्युद्धंतद्दिशिदापयेत् ॥ ज-
यत्येवनसंदेहः शक्रोऽपियदिचाग्रतः ॥ २४१ ॥

अर्थ:- ज्या दिशेस वायु वाहतो त्या दिशेस उभे राहून युद्ध करावें ह्मणजे
इंद्र जरी युद्ध करण्यास आला, तरी त्यास तो जिंकतो. ॥ २४१ ॥ ॥

यत्रनाड्यांवहेद्वायु-स्तदंगेप्राणमेवच ॥ आकृ-
ष्यगच्छेत्कर्णांतं जयत्येवपुरंदरं ॥ २४२ ॥ ॥

अर्थ:- ज्या नाडींत वायु वाहतो, त्याच अंगाचा प्राण आकर्षण करून
काना पर्यंत आणावा; असें केल्यानें तो इंद्रास ही जिंकतो. ॥ २४२ ॥

प्रतिपक्षप्रहारेभ्यः पूर्णांगंयोभिरक्षति ॥ नत-
स्यरिपुभिःशक्ति-र्बलिष्ठैरपिहन्यते ॥ २४३ ॥

अर्थ:- जो शत्रूच्या प्रहारापासून आपलें पूर्ण अंग रक्षण करतो, त्या-
ची शक्ति मोठ्या बलिष्ठ शत्रूनींही हरण केली जात नाहीं. ॥ २४३ ॥❖

अंगुष्ठतर्जनीवंशे - पादांगुष्ठेतयाध्वनिः ॥ यु-

दूकालेचकर्त्तव्यो-लक्षयोद्धाजयीभवेत् २४४

अर्थ:- अंगुष्ठ व तर्जनी ( हाताची ) व पायाचा अंगुष्ठ या ठिकाणीं युद्धाचे वेळेस ध्वनिकरावा ह्मणजे तो लक्षावधि मनुष्यांशीं युद्धकरून जय मिळवतो. ॥२४४॥ ॥ ❖ ॥ ॥ ६ ॥

निशाकरेरवौचारे मध्येयस्यसमीरणः॥स्थि-
तोरक्षेद्दिगंतानि जयकांक्षीगतःसदा॥२४५॥

अर्थ:- चंद्र किंवा सूर्य स्वर चालतानां वायु मध्यें वाहत असल्यास जयेच्छुपुरुषानें दिगुरक्षण करावें. ॥२४५॥ ॥ ॥ ६ ॥

श्वासप्रवेशकालेतु दूतोजल्पतिवांछितं॥त-
स्यार्थःसिद्धिमायाति निर्गमेनैवसुंदरि॥२४६॥

अर्थ:- श्वास आंत प्रवेश करतानां दूत इच्छितवार्त्ता जर सांगेल तर तें सर्वकार्य सिद्धीस जातें, श्वास बाहेर पडतानां सांगितलेलें कार्य कधीं होतनाहीं ४६

लाभादीन्यपिकार्याणि पृष्टानिकीर्त्तितानिच॥
जीवेविशंतिसिद्ध्यंति हानिर्निस्सरणेभवेत् २४७

अर्थ:- लाभादिक कोणतींही शुभकार्यें, जीवनाडी कडे उभेंराहून श्वास आंत जात असतां विचारलेलीं किंवा सांगितलेलीं कार्यें सिद्धीस जाता-त; आणि श्वासाचे निर्गमकाळीं विचारलीं असतां हानिसूचक हो-तात. ॥ २४७ ॥ ॥❖॥ ॥ ६ ॥

नरेदक्षास्वकीयाच स्त्रियांवामाप्रशस्यते॥कुं-
भकोयुद्धकालेच तिस्रोनाड्यस्त्रयीगतिः २४८

अर्थ:- पुरुषांस रवि ( दक्षिणनाडी ) इष्ट होय, स्त्रियांस चंद्र ( वामनाडी ) इष्ट आणि युद्धकालीं कुंभक प्रशस्त जाणावा. याप्रमाणें तीननाडींच्या तीन गति जाणाव्या. ॥ २४८ ॥ ॥❖॥ ॥ ६ ॥

हकारस्यसकारस्य विनाभेदंस्वरःकथं ॥ सो-
हंहंसःपदेनैव जीवोजयतिसर्वदा ॥ २४९ ॥

अर्थ:- हकार आणि सकार यांचा भेद समजल्या वांचून स्वरज्ञान होतना-हीं, याकरितां हकार व सकार यांचें स्वरूप जाणलें ह्मणजे जीव हंस आणि सोहं या पदानें सर्वोत्कर्षास पावतो. ॥ २४९ ॥ ॥ ६ ॥

शून्यांगंपूरितंकृत्वा जीवांगेगोपयेज्जयं ॥ जी-
वांगेघातमाप्नोति शून्यांगंरक्षतेसदा ॥ २५० ॥

अर्थः- शून्य अंग असेल तें पूर्णकरून जीवांगाचें रक्षण करावें ह्मणजे जय प्राप्त होतो; जीवांगाचें रक्षण नकरून शून्यांगाचें रक्षण केल्यास घात होतो. ॥ २५० ॥ ॥ ॥ ॥ ६ ॥

वामेवायदिवा दक्षे यदिपृच्छतिपृच्छकः ॥ पू-
र्णेघातोनजायेत शून्येघातंविनिर्दिशेत् ॥ २५१ ॥

अर्थः- डावे किंवा उजवे अंगास पृच्छक युद्धांत गेलेल्या विषयीं प्रश्न करील तर तें अंग पूर्ण असल्यास घात होणार नाहीं आणि शून्य असल्यास घात होईल असें जाणावें. ॥ २५१ ॥ ॥ ॥ ६ ॥

भूतत्त्वेनोदरे घातः पदस्थानेऽबुनाभवेत् ॥ ऊ-
रुस्थानेऽग्नितत्त्वेन करस्थानेचवायुना ॥ २५२

अर्थः- प्रश्नाचे वेळेस भूमितत्त्व चालत असल्यास पोटाचे ठिकाणीं घात होतो, उदकतत्त्व असतां पायावर, अग्नितत्त्व असल्यास मांड्याचे ठिकाणीं आणि वायुतत्त्व चालत असतां हाताचे ठिकाणीं घात होतो. २५२

शिरसिव्योमतत्त्वेच ज्ञातव्योघातनिर्णयः ॥ ए-
वंपंचविधो घातः स्वरशास्त्रेप्रकाशितः ॥ २५३ ॥

अर्थः- आकाशतत्त्व चालत असल्यास मस्तकाचे ठिकाणीं घात होतो, याप्रमाणें पांच प्रकारचा घात स्वरशास्त्रांत सांगितला आहे, त्यावरून जाणावें. ॥ २५३ ॥ ॥ ॥ ॥ ६ ॥

युद्धकालेयदाचंद्रः-स्थायीजयतिनिश्चितं ॥ य-
दासूर्यप्रवाहस्तु यायीविजयतेतदा ॥ २५४ ॥

अर्थः- युद्धकाळीं जर चंद्रस्वर असेल तर स्थायिकवीराचा जय होतो; आणि सूर्यस्वराचा प्रवाह असल्यास चालून आलेल्या वीराचा जय होतो. ॥ २५४ ॥ ॥ ॥ ॥ ६ ॥

जयमध्येतुसंदेहे नाडीमध्यंतुलक्षयेत् ॥ सुषु-
म्नायांगतेप्राणे समरेशत्रुसंकटं ॥ २५५ ॥

अर्थः- जया विषयीं संशय असल्यास नाडींचें मध्य अवलोकन करावें

आण सुषुम्नेंत चालू असल्यास संग्रामांत शत्रुपासून संकट मासहोतें. ५५

यस्यानाड्याभवेच्चारस्तांदिशंयुधिसंश्रयेत् ॥
तदासौजयमाप्नोति नात्रकार्याविचारणा २५६

अर्थः- जी नाडी वाहत असेल त्या नाडीच्या उक्त ( ह्मणजे चंद्रनाडी असतां पूर्वोत्तरेस व सूर्य असतां दक्षिण पश्चिमेस ) दिशेस उभेराहून युद्ध करणारास निश्चयानें जय मिळतो. ॥ २५६ ॥ ॥ छ ॥

यदिसंग्रामकालेतु वामनाडीयदावहेत् ॥ स्थायिनोविजयंविद्यात् रिपुवश्योदयोऽपिच २५७

अर्थः- युद्धाचे वेळेस जर वामनाडी वाहत असेल तर स्थायि वीरास जय प्राप्त होतो, शत्रु नष्ट होतात. ॥ २५७ ॥ ॥ छ ॥

यदिसंग्रामकालेतु सूर्यस्तुव्यापृतोवहेत् ॥ तदायायिजयंविद्यात् सदेवासुरमानवे ॥ २५८॥

अर्थः- जर संग्रामकाळीं सूर्यस्वर वाहूं लागला तर (यायीस) हल्ला करणारास, देव दैत्य व मनुष्यें यांच्या युद्धांत जय प्राप्त होतो. ॥ २५८ ॥

रणेहरेतिशत्रुस्तं वामायांप्रविशेन्नरः ॥ स्थानंविषुवचारेण जयःसूर्येणधावता ॥ २५९ ॥

अर्थः- जो वामनाडीवर युद्धास प्रयाण करतो त्यास शत्रु जिंकतो. विषुव ( सुषुम्ना ) नाडीचा संचार असतां जो जातो त्याचें युद्ध नहोतां त्यास उगीच कोठें तरी राहावें लागतें. आणि सूर्यनाडीचा प्रचार असतां जो जातो त्यास निश्चयानें जय मिळतो - ॥ २५९ ॥ ॥ छ ॥

युद्धद्वयेकृतेप्रश्ने पूर्णस्यप्रथमेजयः ॥ रिक्तेचैवद्वितीयस्य जयीभवतिनान्यथा ॥ २६० ॥

अर्थः- दोघानीं युद्धांत जयाविषयीं प्रश्न केल्यास प्रथम प्रश्न करणारा पूर्णस्थानीं असल्यास त्याचा जय होतो आणि तो रिक्तस्थानीं असल्यास दुसऱ्यास जयप्राप्त होतो. ॥ २६० ॥ ॥ छ ॥

पूर्णनाडीगतःपृष्ठे शून्यांगंचतदग्रतः ॥ शून्यस्थानेकृतःशत्रु-र्म्रियतेनात्रसंशयः ॥ २६१ ॥

अर्थ ॥ पूर्णनाडीकडे शत्रु असतां त्यास पृष्ठभागीं करावें ह्मणजे त्या

स पाठमोरे व्हावें आणि शून्यस्थानीं असतां त्यास सामोरे व्हावें कारण शून्यस्थानीं केलेला शत्रु निःसंशय मरण पावतो. ॥ २६१ ॥ ॥

वामाचारेसमंनाम यस्यतस्यजयोभवेत् ॥ पृ-
च्छकोदक्षिणेभागे विजयीविषमाक्षरः ॥ २६२ ॥

अर्थः- कोणी पृच्छक वामभागीं जया विषयीं प्रश्न करील तर त्याच्या मुखांतून निघालेलीं प्रश्नाक्षरें किंवा ज्या विषयीं पुसतो त्याचीं नामाक्षरें विषम कीं सम हें पहावें, सम असल्यास जय व विषम असल्यास पराजय होतो. दक्षिण भागीं प्रश्नकरणाराचीं प्रश्नाक्षरें विषम असल्यास जय व सम असतां पराजय होतो. ॥ २६२ ॥ ॥ ॥ ७ ॥

यदापृच्छतिचंद्रस्य तदासंधानमादिशेत् ॥ पृच्छे-
द्यदातुसूर्यस्य तदाजानीहिविग्रहं ॥ २६३ ॥

अर्थः- पृच्छक जर चंद्रस्वरावर युद्धप्रश्न करील तर संधि (तह) होईल, आणि सूर्यस्वरावर पृच्छा केल्यास युद्ध होईल असें जाणावें. ॥ २६३ ॥ ॥

पार्थिवेचसमंयुद्धं सिद्धिर्भवतिवारुणे ॥ युद्धे
हितेजसोभंगो मृत्युर्वायोनभस्यपि ॥ २६४ ॥

अर्थः- पृथ्वीतत्त्वावर युद्धास आरंभ झाला असतां युद्धांत बरोबरी होते, जलतत्त्वावर जयप्राप्ती, तेजतत्त्वावर युद्धभंग, आणि वायु व आकाश या तत्त्वांवर मृत्यु होतो असें जाणावें. ॥ २६४ ॥ ॥ ७ ॥

निमित्तकुप्रमादाद्वा यदानज्ञायतेऽनिलः ॥ पृ-
च्छाकालेतदाकुर्या-दिदंयत्नेनबुद्धिमान् ॥ २६५ ॥

अर्थः- कांहीं निमित्तानें अथवा प्रमादानें वायु (स्वर) जेव्हां दक्षिण किंवा उत्तर आहे हें समजत नाहीं तेव्हां प्रश्नकालीं सुज्ञमनुष्यानें हा पुढें सांगितलेला यत्न करावा. ॥ २६५ ॥ ॥ ॥ ७ ॥

निश्चलांधारणांकृत्वा पुष्पंहस्तान्निपातयेत् ॥ पू-
र्णांगेपुष्पपतनं शून्यंवातत्परंभवेत् ॥ २६६ ॥

अर्थः- निश्चलमनानें शरीर समान करून हातांतून समोरचे जमिनीवर पुष्प टाकावें, तें ज्या अंगास जाईल तें पूर्ण अंग व दुसरें शून्य अंग जाणावें २६६

तिष्ठन्नुपविशन्वाऽपि प्राणमाकर्षयन्निजं ॥ मन-

णोभंगमकुर्वाणःसर्वकार्येषुजीवति ॥ २६७॥

अर्थः- कोणतेंही कार्य करतानां उभाराहून किंवा बसून मनोत्साहाचा भंग नहोऊंदेतां जो मनुष्य आपल्या प्राणवायूस आंत आकर्षण करतो तो त्या कार्याची सिद्धीकरतो. ॥ २६७॥ ॥ ७॥ ॥ ५ ॥

नकालोविविधंघोरं नशास्त्रंनचपन्नगाः ॥ नशा-
त्रुव्याधिचोराद्याः शून्यस्थानाद्वितुंक्षमाः २६८

अर्थः- काल, शास्त्र, सर्प, शत्रु, व्याधि आणि चोर हे शून्यस्थानीं असले तर त्या मनुष्याचा नाशकरण्यास समर्थ होत नाहींत. ॥ २६८॥ ॥

जीवेनस्थापयेद्वायुं जीवेनारंभयेत्पुनः ॥ जीवे
नक्रीडतेनित्यं द्यूतेजयतिसर्वथा ॥ २६९ ॥

अर्थः- जीव स्वरानें वायु स्थिरकरावा आणि जीवस्वरानेंच पुन्हा सोडावा, द्यूत क्रीडा जीवस्वरावर त्याच अंगानें केली असतां जय प्राप्तहोतो ६९

स्वरज्ञानिबलादग्रे निष्फलंकोटिधाभवेत् ॥ इ-
हलोकेपरत्रापि स्वरज्ञानीबलीसदा ॥ २७० ॥

अर्थः- स्वरतत्त्वाचें ज्ञान ज्यास आहे त्यापुढें कोणाचेंही बळ चालत नाहीं, कोणी त्याविषयीं विरुद्ध कोट्यावधि प्रयत्न केले तरी ते विफळ होतात. स्वरज्ञानी या लोकीं व परलोकीं सर्वकाळ बलिष्ठ होय. ॥ २७० ॥ ॥ ॥

दशशतायुतंलक्षं देशाधिपबलंक्वचित् ॥ श-
तक्रतुसुरेंद्राणां बलंकोटिगुणंभवेत् ॥ २७१ ॥

अर्थः- कांहीं राजांस दहा, शंभर, दहाहजार किंवा लक्ष वीरांचें बल असतें तें या स्वराचेंच बळ होय; इंद्र किंवा ब्रह्मादिक देव यांस कोट्यावधि वीरांचें बळ आहे तेंही स्वरबळच समजावें. ॥ २७१ ॥ ॥ ५ ॥

॥देव्युवाच॥ परस्परंमनुष्याणां युद्धेप्रोक्तोजय-
स्त्वया ॥ यमयुद्धेसमुत्पन्ने मनुष्याणांकथंजयः ७२

अर्थः- पार्वती विचारते; हे शंकरा, मनुष्यांच्या परस्पर युद्धांत जयपराजय तुम्हीं सांगितले परंतु जर यमाशीं युद्धकरण्याचा प्रसंग आला तर मनुष्यास जय कसा प्राप्त होईल. ॥ २७२ ॥ ॥ ॥ ६ ॥

॥ ॥ ईश्वरउवाच ॥ ध्यायेद्देवंस्थिरोजीवं जुहुयाज्जी-

वसंगमे ।। इष्टसिद्धिर्भवेत्तस्य महालाभोजयस्तथा ७३

अर्थ:- स्थिर होऊन देवाचें ध्यान करावें, जीवाचा जीवसंगमांत (कुंभकांत) होम करावा, ह्मणजे त्यापुरुषास इष्टसिद्धि महालाभ व जय हे प्राप्त होतात. ।। २७३ ।। ।। ❖ ।। ।। छ ।।

निराकारात्समुत्पन्नं साकारंसकलंजगत् ।। तत् साकारंनिराकारं ज्ञानेभवतितत्क्षणात् ।।२७४

अर्थ:- साकार हें सर्वजग निराकारापासून उत्पन्न झालें आहे ह्मणून ज्ञान झाल्यानंतर साकार तेंच निराकार होतें याकरितां साकारदृष्टीनें मनुष्य आणि यम यांत तारतम्य आहे परंतु निराकारदृष्टीनें यम, मनुष्य व कीटक यांची योग्यता सारखीच आहे. ।। २७४ ।। ।। ।। छ ।।

।। श्रीदेव्युवाच ।। नरयुद्धंयमयुद्धं त्वयाप्रोक्तंमहेश्वर ।। इदानींदेवदेवानां वशीकरणकंवद ।। २७५ ।।

अर्थ:- पार्वती ह्मणते, हेदेवा शंकरा, आपण नरयुद्ध व यमयुद्ध हें सांगितलें. आतां वशीकरणाचा प्रकार मला सांगावा. ।। २७५ ।। ।।

।। ईश्वरउवाच ।। चंद्रंसूर्येणचाकृष्यस्थापयेज्जीवमंडले ।। आजन्मवशगारामाकथितेयंतपोधनैः २७६

अर्थ:- स्वस्त्रीचा चंद्रस्वर चालू असतां आपल्या सूर्यस्वरानें तिचा चंद्रस्वर आकर्षण करून आपले जीवस्वरांत मिळवावा, ह्मणजे ती स्त्री जन्मभर आपले स्वाधीन होते असें तपोधनमुनींनीं सांगितलें आहे. परस्त्रीविषयीं असें केल्यास नाश होतो. ।। २७६ ।। ।। ।। छ ।।

जीवेनगृह्यतेजीवो जीवोजीवस्यदीयते ।। जीवस्थानेगतोजीवो बालाजीवांतकारकः २७७

अर्थ:- पुरुषानें आपले जीवस्वरानें स्त्रीचा जीवस्वर ग्रहण करावा आणि स्त्रीचे जीवस्वरांत आपला जीवस्वर द्यावा; याप्रमाणें जीवस्वरांचा संयोग केला असतां त्यास्त्रीस जन्मभर तो पुरुष प्रिय होतो. ।। २७७ ।। ।।

रात्र्यंतयामवेलायां प्रसुप्तेकामिनीजने ।। ब्रह्मजीवंपिबेद्यस्तु बालाप्राणहरोनरः ।।२७८ ।।

अर्थ:- रात्रीचे शेवटले प्रहरीं स्त्रियांस गाढ झोंप लागली ह्मणजे त्यांचा-

सुषुम्ना स्वर प्राशन करावा, ह्मणजे त्या स्त्रिया प्राणजाईपर्यंत त्या पुरुषास वश होतात. ॥ २७८ ॥ ॥ःः॥ ॥ ७ ॥

अष्टाक्षरं जपित्वातु तस्मिन्काले गते सति ॥ तत्क्षणं दीयते चंद्रो मोहमायाति कामिनी २७९

अर्थः- नंतर तो सुषुम्ना स्वराचा वेळ गेल्यावर अष्टाक्षर मंत्राचा जप करून मग चंद्रस्वर स्त्रीस द्यावा ह्मणजे ती स्त्री मोह पावते व तत्काळ वश होते ७९

शयने वा प्रसंगे वा युवत्या लिंगनेऽपि वा ॥ यः सूर्येण पिबेच्चंद्रं स भवेत्मकरध्वजः ॥ २८० ॥
शिव आलिंग्यते शक्त्या प्रसंगे दक्षिणेऽपि वा ॥ तत्क्षणाद्दापयेद्यस्तु मोहयेत्कामिनीशतं २८१

अर्थः- शयनकाळीं, आलिंगनाचे वेळीं अथवा अन्य कोणतेही प्रसंगीं जो मनुष्य आपल्या सूर्यस्वरानें स्व स्त्रीच्या चंद्रस्वरास प्राशन करील तो मदना प्रमाणें तीस मोहकारक होईल. ॥ २८० ॥ शिव ( सूर्यस्वर ) शक्तीनें ( चंद्रस्वरानें ) अथवा चंद्रस्वर सूर्यस्वरानें मिश्रित करील तो पुरुष तत्क्षणीं शतावधि स्त्रियांनां मोहित करील. ॥ २८१ ॥ ॥ःः॥ ॥ ७ ॥

सप्तनवत्रयः पंच-वारान्संगस्तु सूर्यभे ॥ चंद्रे द्वितुर्यषट् कृत्वा वश्याभवति कामिनी ॥ २८२ ॥

अर्थः- आतां स्त्रीच्या सूर्यस्वरांत आपला चंद्रस्वर द्यावयाचा असल्यास ७, ९, ३ किंवा ५ वेळां द्यावा. आणि तिचे चंद्रस्वरांत आपला सूर्यस्वर देणें झाल्यास २, ४ किंवा ६ वेळां द्यावा ह्मणजे ती स्त्री वश होते. ॥ २८२

सूर्यचंद्रौ समाकृष्य सर्पाक्रांत्याधरोष्ठयोः ॥ महापद्मे मुखं स्पृष्ट्वा वारंवारमिदं चरेत् ॥ २८३ ॥

अर्थः- सूर्य व चंद्र हे स्वर सर्पगतीनें आकर्षण करून एक कमळ आपल्या व स्त्रीच्या ओठास लावावें नंतर त्या कमळास मुखानें स्पर्श करून पुन्हा स्वरांचे मिश्रण करावें, याप्रमाणें वर सांगितलें तितके वेळां वरचेवर असें करावें. ॥ २८३ ॥ ॥ःः॥ ॥ ७ ॥

आप्राणमिति पद्मस्य यावन्निद्रावशं गता ॥ पश्चाज्जागृति वेलायां चोष्यते गलचक्षुषी ॥ २८४

अर्थ:- वर सांगितलेलें कृत्य ती स्त्री जागी होण्याचेपूर्वी निद्रावश आहे तों पर्यंत करावें. मग ती जागी झाली असतां तिचा गळा व नेत्र चुंबन करावे. ॥ २०४ ॥ ॥ः॥ ॥ छ ॥

अनेन विधिना कामी वशयेत्सर्वकामिनीः॥ इदं नवाच्यमन्यस्मि-न्नित्याज्ञा परमेश्वरी॥ २०५

अर्थ:- अशा विधानानें पुरुष स्त्रीच्या स्वराशीं संयोग करीत असतां स्त्रियांस वश करील. परंतु हें प्रकरण कोणाही स्त्रीलंपट मनुष्यास सांगूनये अशी शंकराची आज्ञा आहे. ॥ २०५ ॥ ॥ः॥ ॥ छ ॥

इति वशीकरणम्

अथ गर्भप्रकरणम्

ऋतुकालभवा नारी पंचमेऽन्हियदाभवेत्॥ सूर्याचंद्रमसोर्योगे सेवनात्पुत्रसंभवः॥ २०६॥

अर्थ:- ऋतुस्नात झालेली स्त्री पंचम दिवशीं पतिसह रममाण होतांना तिचा चंद्रस्वर व पतीचा सूर्यस्वर असेल त्यावेळीं संभोग झाला तर पुत्राचा गर्भ राहून दिव्य पुत्र होतो. ॥ २०६॥ ॥ः॥ ॥ छ ॥

शंखवल्लींगवांदुग्धे पृथ्व्यापोवहतेयदा॥ भर्तुरेववदेद्वाक्यं दर्पदेहित्रिभिर्वचः॥ २०७॥

अर्थ:- पृथ्वी किंवा उदक तत्त्व चालू असतां ऋतुस्नात स्त्रीनें गायीचे दुधांत शंखवल्ली ( सांखवेल ) प्राशन करावी; नंतर पतीची संभोगदे ह्मणून त्रिवार प्रार्थना करावी. ॥ २०७॥ ॥ ॥ छ ॥

ऋतुस्नाता पिबेन्नारी ऋतुदानंतुयोजयेत्॥ रूपलावण्यसंपन्नो नरसिंहः प्रसूयते॥ २०८॥

अर्थ:- ऋतुस्नात झालेल्या स्त्रीस वरील औषध पाजून मग पुरुषानें संभोग करावा ह्मणजे रूपवान् व पराक्रमी असा पुत्र उत्पन्न होतो. ०८

सुषुम्ना सूर्यवाहेन ऋतुदानंतुयोजयेत्॥ अंगहीनः पुमान्यस्तु जायतेत्रासविग्रहः॥ २०९॥

अर्थ:- सूर्यस्वराच्या प्रवाहांत सुषुम्नास्वर वाहत असतांना जो ऋतुकालीं रतिदान करील त्यास अंगहीन व कुरूपी असा मुलगा होतो. ॥ २०९॥

विषमांकेदिवारात्रौ विषमांकेदिनाधिपः॥ चं-
द्रनेत्राग्नितत्त्वेषु वंध्यापुत्रमवाप्नुयात्॥२९०॥ २९८

अर्थः- ऋतुमास झाल्यापासून चार दिवसानंतर विषम दिवसीं सूर्यस्वर-वाहत असतां (अर्थात् स्त्रीचा चंद्रस्वर असतानां) पृथ्वी, उदक व अग्नि या तत्त्वांवर पुरुषानें गर्भदान केल्यास वंध्येलाही पुत्र होतो.॥२९०॥ ॥

ऋत्वारंभेरविःपुंसां स्त्रीणांचैवसुधाकरः॥ उ-
भयोःसंगमेप्राप्ते वंध्यापुत्रमवाप्नुयात्॥२९१॥

अर्थः- ऋतुकाळीं पुरुषाचा रवि आणि स्त्रीचा चंद्र वाहत असून उभयतांचा संगम झाला असतां वंध्येलाही पुत्र होतो.॥२९१॥ ॥ छ ॥

ऋत्वारंभेरविःपुंसां शुक्रांतेचसुधाकरः॥ अ-
नेनक्रमयोगेन नादत्तेदैवदारुकः॥२९२॥

अर्थः- ऋतूच्या आरंभीं पुरुषाचा सूर्यस्वर असून वीर्यस्राव झाल्यानंतर चंद्रस्वर चालू झाल्यास महायोग जाणावा, परंतु दैवहीनास हा योग दुर्लभ होय.९२

चंद्रनाडीयदाप्रश्ने गर्भेकन्यातदाभवेत्॥ सू-
र्योभवेत्तदापुत्रो द्वयोर्गर्भोविहन्यते॥२९३॥ २९५

अर्थः- प्रश्नकालीं चंद्रस्वर वाहत असल्यास कन्या गर्भ आहे आणि सूर्यस्वर असतां पुत्रगर्भ आहे असें जाणावें. दोनीस्वर एकदम (सुषुम्ना) वाहत असल्यास गर्भनाश होतो असें जाणावें.॥२९३॥ ॥ छ ॥

पृथ्वीपुत्रीजलेपुत्रः कन्यकातुप्रभंजने॥ तेज-
सिगर्भपातःस्या- न्नभस्यपिनपुंसकः॥२९४॥ २९९

अर्थः- प्रश्नकालीं पृथ्वीतत्त्व असतां कन्या, जलतत्त्व असल्यास पुत्र, वायु असतां कन्या, तेजतत्त्व असतां गर्भपात आणि आकाशतत्त्व असल्यास नपुंसक होतो. असें जाणावें.॥२९४॥ ॥ छ ॥

चंद्रेस्त्री पुरुषःसूर्ये मध्यमार्गेनपुंसकः॥ गर्भ-
प्रश्नेयदादूतः पूर्णेपुत्रःप्रजायते॥२९५॥ २९३

अर्थः- चंद्रस्वरावर गर्भप्रश्न केल्यास कन्या, सूर्यस्वरावर पुत्र व सुषुम्नेवर नपुंसक होतो. प्रश्नकरणारानें पूर्णअंगीं येऊन प्रश्न केल्यास पुत्र होतो असें जाणावें.॥२९५॥ ॥:॥ ॥ छ ॥

शून्येशून्यंयुगेयुग्मं गर्भपातश्चसंक्रमे ॥ त-
त्त्ववित्सविजानीयात् कथितंतवसुंदरि ॥ २९६

अर्थः- हे सुंदरि शून्यअंगीं येऊन विचारिल्यास शून्य जाणावें आणि दोन्ही स्वर चालू असतां प्रश्नकेल्यास जुळें होईल. संक्रमावर (ऋतुसंधेत किंवा स्वर बदलतानां) विचारिलें तर गर्भपात होतो; असें तत्त्ववेत्त्यानें जाणावें.९६

गर्भाधानंमारुतेस्याद्दुःखी दिक्षुख्यातोवारु-
णेसौख्ययुक्तः ॥ गर्भस्रावःस्वल्पजीवश्चव-
न्हौ भोगीभव्यःपार्थिवेनार्थयुक्तः ॥ २९७ ॥

अर्थः- वायुतत्त्वावर गर्भाधान झालें असतां तो पुत्र दुःखी होतो. वरुण (उदक) तत्त्वावर झाल्यास तो प्रसिद्ध व सुखी होतो. अग्नितत्त्वावर झालें तर गर्भस्राव होतो किंवा अल्पायुषी होतो आणि पृथ्वीतत्त्वावर झाल्यास भोगी, भव्य व धनिक असा पुत्र होतो. ॥ २९७ ॥ ॥ ॥ छ ॥

धनवान्सौख्ययुक्तश्च भोगवानर्थसंस्थितिः ॥
स्यान्नित्यंवारुणेतत्त्वे व्योम्निगर्भोविनश्यति २९८

अर्थः- वरुणतत्त्वावर गर्भराहिल्यास तो धनवान्, सुखी व भोगी असा होतो. आकाशतत्त्वावर राहिलेला गर्भ नाश पावतो. ॥ २९८ ॥ ॥

माहेंद्रेसुसुतोत्पत्ति-र्वारुणेदुहिताभवेत् ॥ शेषे-
षुगर्भहानिःस्या-ज्जातमात्रस्यवामृतिः ॥ २९९ ॥

अर्थः- पृथ्वीतत्त्वावर उत्तमपुत्र उत्पन्न होतो व उदक तत्त्वावर कन्या सुंदर होते. इतरतत्त्वांवर गर्भधारण झाल्यास गर्भाचा नाश होतो; अथवा जन्मतांच मरतो. ॥ २९९ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

रविमध्यगतश्चंद्र-श्चंद्रमध्यगतोरविः ॥ ज्ञात-
व्यंगुरुतःशीघ्रं नवेदैःशास्त्रकोटिभिः ॥ ३०० ॥

इति गर्भ प्रकरणम्.

अर्थः- सूर्यस्वर चालू असतानां चंद्रस्वर चालू लागतो व चंद्रस्वर चालतानां सूर्यस्वर चालूलागतो हें मात्र पुरतेपणानें गुरूपासून समजून घ्यावें. कारण गुरुशिवाय कोटिशास्त्रें किंवा वेद अध्ययन केल्यानें हें समजत नाहीं.३०

अथ संवत्सर फलम्.

चैत्रशुक्लप्रतिपदि प्रातस्तत्त्वविभेदतः ॥ पश्ये-
द्विचक्षणोयोगी दक्षिणेचोत्तरायणे ॥ ३०१ ॥

अर्थः- चैत्र शुद्ध १ प्रतिपदेस व दक्षिणायन आणि उत्तरायण होतें त्या दिवसीं वाहणारे तत्त्वांचे भेदावरून विचक्षण पुरुषानें संवत्सरफल पहावें. ३०१

चंद्रोदयस्यवेलायां वहमानाऽथतत्त्वतः ॥ पृ-
थिव्यापस्तथावायुः सुभिक्षंसर्वसस्यजं ॥ ३०२

अर्थः- चंद्रोदयावर ह्मणजे चंद्रस्वर चालू असतां जर प्रातःकालीं उत्थान होईल आणि चंद्रस्वरांत पृथिवी, उदक व वायु हीं तत्त्वें चालत असतील तर सर्व धान्यांचें सुभिक्ष होईल असें जाणावें. ॥ ३०२ ॥ ॥ छ ॥

तेजोव्योम्नोर्भयंघोरं दुर्भिक्षंकालतत्त्वतः ॥ ए-
वंतत्त्वफलंज्ञेयं वर्षमासेदिनेष्वपि ॥ ३०३ ॥

अर्थः- तेज आणि आकाश हीं तत्त्वें चालत असतां दुर्भिक्ष होईल, असें काल, स्वर व तत्त्व यावरून जाणावें. याचप्रमाणें वर्ष महिना आणि दिवस यांचे ठिकाणीं तत्त्वावरून फल जाणावें. ॥ ३०३ ॥ ॥ छ ॥

मध्यमाभवतिक्रूरा दुष्टासर्वेषुकर्मसु ॥ देश-
भंगमहारोगाः क्लेशकष्टादिदुःखदाः ॥ ३०४ ॥

अर्थः- मध्यनाडी (सुषुम्ना) फार क्रूर आणि सर्वकार्यास दुष्ट होय ही चैत्र प्रतिपदेस प्रातःकालीं वाहत असल्यास देशभंग, महारोग, श्रम, कष्ट इत्यादि अनेक दुःखें देशांत होतात. ॥ ३०४ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

मेषसंक्रांतिवेलायां स्वरभेदंविचारयेत् ॥ सं-
वत्सरफलंब्रूया-ल्लोकानांतत्त्वचिंतकः ॥ ३०५ ॥

अर्थः- मेष संक्रातीचे वेळेस स्वरभेदाचा विचार करावा आणि स्वरांतील तत्त्वांचें विवेचन करून संवत्सर फल सांगावें. ॥ ३०५ ॥ ॥ छ ॥

पृथिव्यादिकतत्त्वेन दिनमासाब्दजंफलं ॥ शो-
भनंचयथादुष्टं व्योममारुतवन्हिभिः ॥ ३०६ ॥

अर्थः- पृथिव्यादि तत्त्वांवरून दिवस मास व वर्ष यांचें फळ जाणावें, त्यांत पृथ्वी व आप हीं तत्त्वें चालू असतां शुभफल आणि आकाश, वायु व अग्नि या तत्त्वांवर दुष्टफल समजावें. ॥ ३०६ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

स्रुभिक्षंराष्ट्रवृद्धिःस्या-द्बहुसस्यावसुंधरा ॥ ब
हुवृष्टिस्तथासौख्यं पृथ्वीतत्त्वंवहेद्यदि ॥ ३०७ ॥

अर्थ- मेषसंक्रांतीचे वेळीं प्रथम पृथ्वीतत्त्व वाहत असल्यास स्रुपीक, देशाची वृद्धि, धान्याची प्रचुरता, पुष्कळवृष्टि आणि सौख्य हीं फळें प्राप्त होतात. ॥ ३०७

अतिवृष्टिःस्रुभिक्षंस्या-दारोग्यंसौख्यमेवच ॥
बहुसस्यातथापृथ्वी अप्तत्त्वंवैवहेद्यदि ॥ ३०८ ॥

अर्थ- उदकतत्त्व वाहात असल्यास अतिवृष्टि, स्रुभिक्ष, आरोग्य, सौख्य व पुष्कळधान्यांची उत्पत्ति हीं फळें होतात. ॥ ३०८ ॥ ॥ ५ ॥

दुर्भिक्षंराष्ट्रभंगःस्या-दुत्पत्तिश्चविनश्यति ॥ अ-
ल्पाद्ल्पतरावृष्टि-रग्नितत्त्वंवहेद्यदि ॥ ३०९ ॥

अर्थ- अग्नितत्त्व वाहत असल्यास दुर्भिक्ष, देशभंग, संततीचा व धान्योत्पत्तीचानाश, आणि अत्यल्पवृष्टि हीं फळें होतात. ॥ ३०९ ॥ ॥

उत्पातोपद्रवाभीति-रल्पावृष्टिःस्युरीतयः ॥ मे-
षसंक्रांतिवेलायां वायुतत्त्वंवहेद्यदि ॥ ३१० ॥

अर्थ- उल्कापातादि-अरिष्टें, भीति, अल्पवृष्टि व ईति (अवर्षण, अतिवृष्टि इत्यादि सहा पिकाचीं विघ्नें) ह्या, मेषसंक्रातीचेवेळेस वायुतत्त्व वाहतअसतां होतात. ॥ ३१० ॥ ॥ ❖ ॥ ॥ ५ ॥

मेषसंक्रांतिवेलायां व्योमतत्त्वंवहेद्यदि ॥ त-
त्रापिशून्यताज्ञेया सस्यादीनांसुखस्यच ३११

अर्थ- मेषसंक्रांतीचे वेळेस आकाशतत्त्व वाहतअसल्यास धान्यादिकांचीव स्रुखाची शून्यता होईल असें जाणावें. ॥ ३११ ॥ ॥ ५ ॥

पूर्णप्रवेशनेश्वासे सस्यंतत्त्वेनसिद्ध्यति ॥ सू-
र्यचंद्रेऽन्यथाभूते संग्रहःसर्वसिद्धिदः ॥ ३१२ ॥

अर्थ- पूर्ण व आंत प्रवेशकरणारे श्वासांत वर सांगितल्याप्रमाणें तत्त्वावरून धान्यसिद्धि होते; परंतु तत्त्वोदयाचे वेळेस सूर्य व चंद्रस्वर हे जर विपरीत होतील ह्मणजे चंद्राचेजागींसूर्य व सूर्याचे जागीं चंद्र येईल तर मात्र धान्यांचा संग्रह करावा ह्मणजे स्रुखप्रद होतो. ॥ ३१२ ॥ ॥ ५ ॥

विषमेवन्हितत्त्वंस्या-ज्ज्ञायतेकेवलंनभः ॥ त-

कुर्याद्वस्तुसंग्राहो द्विमासेचमहर्घता ॥ ३१३ ॥

अर्थ- विषम (दक्षिण) स्वरांत प्रथम अग्नितत्त्व असून पुढें जर आकाशतत्त्व प्रगट होईल तर सर्व वस्तूंचा संग्रह करावा; कारण दोनमहिन्यांत सर्ववस्तूंची महर्घता होते. ॥ ३१३ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

रवौसंक्रमतेनाडी ग्लावमंतेप्रसर्पिता ॥ रवानिलेवन्हियोगेन रौरवंजगतीतले ॥ ३१४ ॥

इति संवत्सर प्रकरणम्

अर्थ- रात्र संपण्याचे वेळीं चंद्र स्वर वाहत असून प्रातःकालीं जर सूर्यनाडीगतस्वर होईल आणि त्या स्वरांत आकाश, वायु व अग्नि हीं तत्त्वें उदय पावतील तर पृथ्वीतळावर अनेक अनर्थ होऊन जनास यातना होतील. ३१४

अथ रोग प्रकरणं

महीतत्त्वेस्वरोगश्चजलेचजलमातरः ॥ तेजसिखेटवाटीच शाकिनी पितृदोषतः ॥ ३१५ ॥

अर्थ- पृथ्वीतत्त्वावर रोगप्रश्न केला तर शारीररोग समजावा; जलतत्त्वावर जलमातृका संबंधि पीडा आहे; तेजतत्त्व प्रश्नकालीं असतां खेडें वाडी येथील शाकिनी किंवा पितर यांचा दोष आहे असें जाणावें. ॥ ३१५ ॥ ॥

आदौशून्यगतोदूतः पश्चात्पूर्णेविशेद्यदि ॥ मूर्च्छितोऽपिध्रुवंजीवे-द्यदर्थंपरिपृच्छति ॥ ३१६ ॥

अर्थ- पृच्छाकरणारा प्रथम शून्य अंगास येऊन पुनः पूर्ण अंगास जर जाईल तर ज्यासाठीं प्रश्न करतो तो मनुष्य मूर्च्छित असला तरी जीवंत राहतो. ॥ ३१६ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

यस्मिन्नंगे स्थितोजीव-स्तत्रस्थःपरिपृच्छति ॥ तदाजीवतिजीवोसौ यदिरोगैरुपद्रुतः ॥ ३१७

अर्थ- जें अंग पूर्ण आहे तिकडे उभा राहून प्रश्न केल्यास तो मनुष्य अनेक रोगांनीं जरी उपद्रुत असला तरी जीवंत राहील. ॥ ३१७ ॥ ॥ छ ॥

दक्षिणेनयदावायु-र्दूतोरौद्राक्षरोवदेत् ॥ तदा जीवतिजीवोसौ चंद्रेसमफलंभवेत् ॥ ३१८ ॥

अर्थ- आतां वायु दक्षिणनाडींत असतां दूत येऊन रौद्र (क्रूर) अक्षरें

जर बोलेल तर तो रोगी वांचेल असें जाणावें. जर क्रूरभाषणकाळीं चंद्रवाहू लागेल तर शुभ फळ जाणावें. ॥ ३१८ ॥ ॥ ॥ छ ॥

जीवाकारंचवाधृत्वा जीवाकारं विलोक्यच ॥ जीव स्थोजीवितप्रश्ने तस्यस्याज्जीवितंफलं ॥ ३१९ ॥

अर्थः- जीवाची आकृती हातांत धरून आणि जीवाच्या आकाराकडे बघून जीव (पूर्ण) अंगास उभाराहून जो जीविता विषयीं प्रश्नकरील त्याचें जीवित सफल होईल. ॥ ३१९ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

वामचारेतथादक्ष-प्रवेशोयत्रवाहने ॥ तत्र-स्थःपृच्छतेदूत -स्तस्यसिद्धिर्नसंशयः ३२०

अर्थः- वाम (इडा) किंवा दक्षिण (पिंगला) नाडींतून वायुसंचार किंवा प्रवेश करीत असतां दूत जीवांगीं उभाराहून प्रश्न करील तर त्यास इष्टसिद्धि होते यांत संशय नाहीं. ॥ ३२० ॥ ॥ ॥ छ ॥

प्रश्नेचाधःस्थितोजीवो नूनंजीवोहिजीवति ॥ ऊर्ध्वचारस्थितोजीवो जीवोयातियमालयं ३२१

अर्थः- प्रश्न करतेवेळीं जो अधोभागीं असेल तो जीवन पावतो आणि जो ऊर्ध्व उभाराहून प्रश्न करतो तो यमालयास जातो असें जाणावें. ॥ ३२१ ॥

विपरीताक्षरप्रश्ने रिक्तायांपृच्छकोयदि ॥ वि-पर्ययंचविज्ञेयं विषमस्योदये सति ॥ ३२२ ॥

अर्थः- विपरीत अक्षरानीं प्रश्नकरून पृच्छक जर रिक्त नाडीकडे उभारा हील व त्यावेळेस विषम (सुषुम्ना) नाडीचा उदय होईल तर विपरीत फळ जाणावें. ॥ ३२२ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

चंद्रस्थानेस्थितोजीवः सूर्यस्थानेतुपृच्छकः ॥ त-दाप्राणवियुक्तोसौ यदिवैद्यशतैर्वृतः ॥ ३२३ ॥

अर्थः- जीव (श्वासवायु) चंद्रनाडींत असतां सूर्यस्थानीं उभाराहून पृच्छक ज्या रोग्याविषयीं प्रश्न करील तो शतावधि वैद्यानीं औषध दिलें तरी प्राणाशीं वियोग पावतो. ॥ ३२३ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

पिंगलायांस्थितोजीवो वामेदूतस्तुपृच्छति ॥ तदापिम्रियतेरोगी यदित्रातामहेश्वरः ॥ ३२४ ॥

अर्थ- श्वास पिंगलानाडींत असतां जर दूत वामभागीं उभाराहून रोगप्रश्न करील तर त्यास साक्षात् शंकरही त्राता असला तरी मरण प्राप्त होतें, असें जाणावें. ॥ ३२४ ॥ ॥ ❀ ॥ ॥ छ ॥

एकस्य भूतस्य विपर्ययेण रोगाभिभूतिर्भवती ह पुंसां ॥ तयोर्द्वयोर्बंधुसुहृद्विपत्तिः पक्षद्वये व्यत्ययतो मृतिः स्यात् ॥ ३२५ ॥

अर्थ- एका भूताचें (तत्त्वाचें) वैपरीत्य झालें तर त्या पुरुषास रोगापासून फार उपद्रव होतो; दोन भूतांत विपर्यय झाल्यास बंधु व इष्ट मित्र यांचा नाश होतो. आणि दोन्ही पक्षीं व्यत्यय घडल्यास रोगी मरण पावतो. ३२५

इति रोगप्रकरणम्

अथ कालप्रकरणम्

मासादौ चैव पक्षादौ वत्सरादौ यथाक्रमं ॥ क्षयकालं परीक्षेत वायुचारवशात्सुधीः ॥ ३२६ ॥

अर्थ- महिन्याच्या पंधरवाड्याच्या आणि वर्षाच्या आरंभीं वायूच्या संचारावरून सुज्ञानें क्षयकाल जाणावा. ॥ ३२६ ॥ ॥ छ ॥

पंचभूतात्मकं दीपं शिवस्नेहेन सिंचितं ॥ रक्षयेत्सूर्यवातेन प्राणी जीवः स्थिरो भवेत् ॥ ३२७ ॥

अर्थ- हा पंचभूतात्मक दीप शिवरूपी स्नेहानें भरलेला आहे यास सूर्यरूप वायूनें सुरक्षित ठेवावा म्हणजे जीव स्थिर होतो. ॥ ३२७ ॥ ॥

मारुतं बंधयित्वा तु सूर्यं बंधयते यदि ॥ अभ्यासाज्जीवते जीवः सूर्यकालेऽपि वंचिते ॥ ३२८ ॥

अर्थ- वायूस रोध करून सूर्य आहे तों पर्यंत (दिवसभर) सूर्यस्वर बंद ठेवावा आणि सूर्यास्त झाल्यावर सूर्यस्वर चालू करावा; अशा अभ्यासानें मनुष्य पुष्कळ दिवस जगतो. ॥ ३२८ ॥ ॥ ❀ ॥ ॥ छ ॥

गगनात्स्रवते चंद्रः कायपद्मानि सिंचयेत् ॥ कर्मयोगसदाभ्यासैरमरः शशिसंश्रयात् ३२९

अर्थ- ब्रह्मांडांतील आकाशापासून चंद्रस्राव होऊन शरीररूप कमळ प्रफुल्लीत होतें या करितां चंद्राचा आश्रय करून कर्मयोगाचा अभ्यास केल्या-

नें योगी अमर होतो. ॥ ३२९ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

शशांकंवारयेद्रात्रौ दिवावार्योदिवाकरः॥ इ-
त्यभ्यासरतो नित्यं सयोगीनात्रसंशयः॥ ३३०॥

अर्थ- रात्रीं चंद्रस्वर निवारण करावा आणि दिवसां सूर्य निवारण करावा, याप्रमाणें अभ्यास करणारा मनुष्य योगी होतो; यांत संशय नाहीं. ॥ ३३०॥

अहोरात्रंयदेकत्र वहतेयस्य मारुतः॥ तदात-
स्यभवेन्मृत्युः संपूर्णवत्सरत्रये॥ ३३१॥ ॥

अर्थ- ज्या मनुष्याच्या एकाच नाडींतून रात्रीं व दिवसां ( एक अहोरात्र ) श्वासवायु वाहतो तो मनुष्य तीनवर्षांनीं मृत्यु पावतो. ॥ ३३१॥ ॥

अहोरात्रद्वयंयस्य पिंगलायांसदागतिः॥ तस्य
वर्षद्वयंप्रोक्तं जीवितंतत्त्ववेदिभिः॥ ३३२॥ ॥

अर्थ- दोन अहोरात्रें ज्याच्यादक्षिण नाडींत वायूची गति असते त्याचें आयुष्य दोनवर्षें आहे असें स्वरतत्त्वाचे ज्ञाते ह्मणतात. ॥ ३३२॥ ॥ ७ ॥

त्रिरात्रंवहतेयस्य वायुरेकपुटेस्थितः॥ तदा
संवत्सरायुस्तं प्रवदंतिमनीषिणः॥ ३३३॥

अर्थ- ज्याचा श्वासवायु एकानाडींत तीन दिवस वाहतो तो मनुष्य एकवर्ष वांचतो, असें विद्वान् ह्मणतात. ॥ ३३३॥ ॥ ७ ॥

रात्रौचंद्रोदिवासूर्यो वहेद्यस्यनिरंतरं॥ जानी-
यात्तस्यवैमृत्युः षण्मासाभ्यंतरेभवेत्॥ ३३४॥

अर्थ- ज्यामनुष्याचा चंद्रस्वर रात्रीं वसूर्यस्वर दिवसां नेहमीं वाहत असेल, त्या मनुष्याचा साहामहिन्याचे आंत मृत्यु होईल असें जाणावें. ३३४

लक्ष्यंलक्षितलक्षणेनसलिलंभानुर्यदादृश्यते,
क्षीणोदक्षिणपश्चिमोत्तरपुरःषट्त्रिद्विमासैकतः
मध्यंछिद्रमिदंभवेद्दशदिनंधूमाकुलंतद्दिने, सर्व
ज्ञैरपिभाषितंमुनिवरैरायुःप्रमाणंस्फुटं॥ ३३५॥

अर्थ- आकाशांत पाणी ठेऊन त्यांत सूर्याचें प्रतिबिंब अवलोकन करावें, तें प्रतिबिंब दक्षिणेस क्षीण दिसत असेल तर सहा महिन्यानीं मृत्यु, पश्चिमेस क्षीण असल्यास तीन महिन्यानीं, उत्तरेस क्षीण दिस-

त्यास दोन महिन्यानीं, पूर्वेस क्षीण असल्यास एकमहिन्यानें, मधें छिद्र दिसलेंतर १० दिवसानीं आणि सर्वप्रतिबिंब धुरकट दिसेल तर तेच दिवशीं मृत्यु होतो, याप्रमाणें सर्वज्ञ मुनींनीं आयुष्याचें प्रमाण सांगितलें आहे. ३३५

दूतो रक्तकषायकृष्णवसनो दंतक्षतो मुंडितः, तैलाभ्यक्तशरीररज्जुककरो दीनश्च पूर्णे नरः॥ भस्मांगारकपालपाशमुशली सूर्यास्तमायानियः, काली शून्यपदस्थितो गदयुतः कालानल स्यादृतः ३३६

अर्थ:- दूत अथवा रोगी तांबडें, भगवें अथवा काळें वस्त्र नेसून अथवा तैलाभ्यंग करून हातीं रज्जु घेऊन दंतक्षतयुक्त, मुंडनकेलेला व दीन असा पूर्णस्वरावर जरी आला तरी व्यर्थ होय. भस्म, अग्नि, कपाल, पाश आणि मुसळ घेऊन सूर्यास्ताचे वेळेस शून्यस्वरावर दूत येईल तर तो रोगी मृत्यूच्या स्वाधीन होतो असें जाणावें. ॥ ३३६॥ ॥ः॥ ॥ ७॥

अकस्माच्चित्तविकृति-रकस्मात्पुरुषोत्तमः॥ अकस्मादिंद्रियोत्पातः सन्निपातप्रलक्षणं ३३७

अर्थ:- अकस्मात् चित्ताला विकार झाल्यास, एकाएकीं प्रकृतींत मोठा बदल झाल्यास अथवा निष्कारण इंद्रियांत उत्पात (दुश्चिन्ह) होउंलागल्यासतें सन्निपाताचें लक्षण जाणावें॥ ३३७॥ ॥ः॥ ॥ ७॥

शरीरं शीतलं यस्य प्रकृतिर्विकृता भवेत्॥ तदरिष्टं समासेन व्यासतस्तु निबोध मे॥ ३३८॥

अर्थ:- शरीर अकस्मात् थंड पडतें व प्रकृति अगदीं विलक्षण विकारास पावल्ये तें ही अरिष्ट जाणावें. याप्रमाणें संक्षेपेंकरून अरिष्टें सांगितलीं, आतां विस्तारेंकरून सांगतों.॥ ३३८॥ ॥ः॥ ॥ ७॥

दुष्टशब्देषु रमते शुद्धशब्देषु चाप्यति ॥ पश्चात्तापो भवेद्यस्य तस्य मृत्युर्न संशयः॥३३९॥

अर्थ:- जो दुष्टशब्द ऐकून रममाण होतो आणि शुद्धशब्द ऐकिले असतां पश्चात्ताप पावतो तो मरणोन्मुख होय. ॥ ३३९॥ ॥ ७॥

हुंकारः शीतलो यस्य फूत्कारो वह्निसन्निभः॥ महावैद्यो भवेद्यस्य तस्य मृत्युर्भवेद्ध्रुवं॥३४०॥

अर्थ:- ज्याच्या नाकांतील हुंकार थंड ासतो आणि तोंडांतील फूत्कार अग्निसारखा तप्त असतो त्यास महावैद्य रक्षण करीत असतां ही मरण येतें. ॥ ३४० ॥ ॥ ॥ ॥ ॥

जिह्वांविष्णुपदं ध्रुवं सुरपदं सप्तमातृका मंडलं, एतान्येव मरुंधतीममृतगुं शुक्रं ध्रुवं वाक्षणं ॥ एतेष्वेकमपिस्फुटं नपुरुषः पश्येत्पुरः प्रेषितः, सोऽवश्यं विशतीह कालवदनं संवत्सरादूर्ध्वतः ३४१

अर्थ:- जीभ, आकाश, ध्रुव, देवमार्ग, मातृका, अरुंधती, चंद्र, शुक्र आणि अगस्त्य यामध्यें कोणता एकही पदार्थ ज्या पुरुषास पुढें असून स्पष्ट दिसत नाहीं तो अवश्य एकवर्षानें कालाचे मुखांत प्रवेश करतो. ॥ ३४१ ॥

अरश्मिबिंबं सूर्यस्य वन्हेः शीतांशुमालिनः ॥ दृष्ट्वैकादशमासायु-र्नरश्चोर्ध्वं नजीवति ॥ ३४२

अर्थ:- ज्या मनुष्यास सूर्याचें आणि चंद्राचें बिंब व अग्नि किरणरहित दिसतो, त्यास अकरा महिने आयुष्य आहे असें समजावें, त्यावर तो वांचत नाहीं. ॥ ३४२ ॥ ॥ ॥ ॥

वाप्यां पुरीषमूत्राणि (कुरुते) सुवर्णरजतं तथा ॥ प्रत्यक्षमथवास्वप्ने (पश्चात्) दशमासान्नजीवति ॥ ३४३ ॥

अर्थ:- स्वप्नांत किंवा जागृतींत जो मनुष्य विहिरींत मलमूत्रांचा उत्सर्ग करतो, व तेथें ज्यास सोनें व रुपें दिसतें तो मनुष्य पूर्ण दहा महिने जगत नाहीं. ॥ ३४३ ॥ ॥ ॥ ॥

कचित्पश्यति यो दीपं सुवर्णं च कषान्वितं ॥ विरूपाणि च भूतानि नवमासान्नजीवति ॥ ३४४

अर्थ:- दीप हा ज्यास कधीं कधीं सुवर्णाप्रमाणें पिवळा आणि कधीं कषाययुक्त ( कृष्णवर्ण ) दिसतो, व सर्व भूतें विपरीत ( विरूप ) दिसतात तो नऊ महिन्यावर जगत नाहीं. ॥ ३४४ ॥ ॥ ॥

स्थूलांगोऽपि कृशः कृशोऽपि सहसा स्थूलत्वमालभ्यते, प्राप्तो वा कनकप्रभां यदि भवेत्क्रूरोऽपि कृष्णच्छविः ॥ शूरो भीरु सुधीरधर्मनिपुणः श्रा-

तोविकारीपुमा-नित्येवंप्रकृतिःप्रयातिचलनंमा-
साष्टकंजीवति॥३४५॥

अर्थः- जो स्थूल असून एकदम रोड होतो किंवा रोड असून एकदम लठ्ठ होतो, क्रूर व काळा मनुष्य एकाएकी सुवर्णासारखा पीतवर्ण व शांत होतो. शूर असून भित्रा, धार्मिक असून अधर्मनिष्ठ व शांत असून चंचळ होतो याप्रमाणें ज्याची प्रकृति शीघ्र विकृतीस पावते तो मनुष्य आठ महिने वांचतो.॥३४५॥ ॥०॥ ॥ ६ ॥

पीडाभवेत्पाणितलेचजिह्वा-मूलेतथास्याद्रु-
धिरंचकृष्णं॥विद्धंनचग्लायतियत्रदिष्ट्या,जी-
वेन्मनुष्यःसहिसप्तमासम्॥३४६॥मध्यांगु-
लीनांत्रितयंनवक्रं,रोगंविनाशुष्यतियस्यकं-
ठः॥मुहुर्मुहुःप्रश्नवशोनजाड्या-त्षड्भिःसमा-
सैःप्रलयंप्रयाति॥३४७

अर्थः- ज्यास तळहात व जिव्हा मूल याठिकाणीं पीडा होते, रक्त काळें होतें व तें टोंचलें असतां गळत नाहीं तो मनुष्य सात महिने जगतो.३४६ ज्याचीं मधील तीन बोटें वांकडीं होत नाहींत, रोगावांचून कंठ शुष्क होतो, पूर्वानुसंधान नसल्यामुळें वारंवार प्रश्न करितो आणि ज्यास जडत्व प्राप्त होतें तो मनुष्य साहा महिन्यानीं मरण पावतो.॥३४७॥ ॥

नयस्यस्मरणंकिंचि-द्विद्यतेस्तनचर्मणि॥सो-
ऽचिरंपंचमेमासि स्कंधारूढोभविष्यति ४८

अर्थः- ज्याचें स्तनसंबधीं चर्म बधिर होतें व ज्यास स्मरण नाहींसें होतें तो पांचवे महिन्यांत मरण पावतो.॥३४८॥ ॥ ६ ॥

यस्यनस्फुरतिज्योतिः पीड्यतेनयनद्वयं॥म-
रणंतस्यनिर्दिष्टं चतुर्थेमासिनिश्चितं॥३४९॥

अर्थः- ज्यास तेज दृष्टिगोचर होत नाहीं आणि ज्याचे नेत्र पीडित होतात त्यास चौथ्या महिन्यांत मरण निश्चित येतें.॥३४९॥ ॥ ६ ॥

दंताश्चवृषणौयस्य नकिंचिदपिपीड्यते॥तृ-
तीयंमासमावर्त्यं कालाज्ञायांभवेन्नरः ३५०

अर्थः- ज्याचे दांत व वृषण पीडितकेले असतां पीडित होतनाहींत तो मनुष्य तीन महिन्या नंतर काळाचे स्वाधीन होतो. ॥ ३५० ॥ ॥

कालोदूरस्थितोवा,पि येनोपायेनलक्ष्यते ॥ तं-
वदामिसमासेन यथादिष्टंशिवागमे ॥ ३५१ ॥

अर्थः- मरणकाळ दूर किंवा समीप आहे हें ज्या उपायानें समजतें तो उपाय शिवागमांत सांगितल्याप्रमाणें संक्षेपानें सांगतों. ॥ ३५१ ॥ ॥ ॥

एकांतंविजनंगत्वा कृत्वादित्यंचपृष्ठतः ॥ निरी-
क्षयेन्निजच्छायां कंठदेशेसमाहितः ॥ ३५२ ॥

अर्थः- निर्जन अरण्यांत एकांतीं जाऊन पृष्ठभागीं सूर्यकरून आपली छाया कंठप्रदेशाचेठिकाणीं निश्चळ अवलोकन करावी. ॥ ३५२ ॥ ॥

ततश्चाकाशमीक्षेत ह्रींपरब्रह्मणेनमः ॥ अष्टो
त्तरशतंजप्त्वा ततःपश्यतिशंकरं ॥ ३५३ ॥ ॥

अर्थः- नंतर आकाश अवलोकन करावें मग "ॐ ह्रींपरब्रह्मणेनमः" या मंत्राचा अष्टोत्तरशे जप करावा म्हणजे शंकराचें दर्शन होतें. ॥ ३५३ ॥

शुद्धस्फटिकसंकाशं नानारूपधरंहरम् ॥ षण्मा
साभ्यासयोगेन भूचराणांपतिर्भवेत् ॥ वर्ष
द्वयेनतेनाथ कर्त्ताहर्त्तास्वयंप्रभुः ॥ ३५४ ॥

अर्थः- जपांतीं शुद्धस्फटिकाप्रमाणें स्वच्छ आणि नानारूपें धारण करणारा शंकर दृष्टिगोचर होतो; असा सहामहिने अभ्यास केला असतां तो सर्वभूचरमाण्यांचा राजा होतो. दोनवर्षें अभ्यास केल्यानें स्वतः सृष्टिकर्त्ता व संहर्त्ता होतो. ॥ ३५४ ॥ ॥ ७ ॥

त्रिकालज्ञत्वमाप्नोति परमानंदमेवच ॥ सत-
ताभ्यासयोगेन नास्तिकिंचित्सुदुर्लभं ॥ ३५५ ॥

अर्थः- असा सतत अभ्यास केला असतां त्रिकालज्ञान प्राप्त होतें व परम आनंदांत नेहमी राहतो वत्यास कांहींच दुर्लभ रहात नाहीं. ॥ ३५५ ॥

तद्रूपंकृष्णवर्णंयः पश्यतिव्योम्निनिर्मले ॥ षण्मा
सान्मृत्युमाप्नोति सयोगीनात्रसंशयः ॥ ३५६ ॥

अर्थः- तें रूप निर्मळ आकाशांत कृष्णवर्ण ज्यास दिसतें तो योगी स-

ह्या महिन्यांत मृत्यु पावतो हें निःसंशय होय. ॥ ३५६॥ ॥ ७ ॥

पीतेव्याधिर्भयंरक्ते नीलेहानिंविनिर्दिशेत्॥ना-
नावर्णेऽथचेत्तस्मिन् सिद्धश्चगीयतेमहान् ३५७

अर्थः- पिवळें रूप दृष्टीस पडलें असतां व्याधि, तांबडें दिसल्यास भय आणि निळें दिसल्यास हानि होईल असें जाणावें. अनेक रंगाचें चित्ररूप दिसलें तर सिद्धि प्राप्त होते. ॥३५७॥ ॥ ॥ ७ ॥

पदे गुल्फे चजठरे विनाशः क्रमशोभवेत्॥वि
नश्यतोयदाबाहू स्वयंतुम्रियतेध्रुवं॥३५८॥

अर्थः- दृष्टिगोचर झालेल्या छायापुरुषाचे पाय, घोटे आणि पोट यांचा क्रमानें आधी नाश होऊन नंतर बाहूंचा नाश झाला असतां योगी मरतो. ॥३५८॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

वामबाहुस्तथाभार्या नश्येतेतिनसंशयः॥ द-
क्षिणेबंधुनाशो हि मृत्युमात्मविनिर्दिशेत्॥३५९

अर्थः- वामहस्ताचा नाश झाल्यास भार्या नाश पावते आणि दक्षिण हस्ताचा नाश झाला म्हणजे बंधुनाश होऊन आपल्यास ही मृत्यु होतो असें जाणावें. ॥३५९॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

अशिरोमासमरणं विनाजंघेदिनाष्टकं॥ अ-
ष्टाभिःस्कंधनाशेन छायालोपेनतत्क्षणात् ६०

अर्थः- छाया शिरावांचून दिसल्यास महिन्यानें, जंघा (पोटऱ्या) शिवाय दिसल्यास किंवा खांद्याचा नाश झाल्यास आठ दिवसांनीं आणि एकदम सर्व छाया नाहींशी झाल्यास तत्क्षणीं मरण प्राप्त होतें. ॥ ३६०॥

प्रातःपृष्ठगतेरवौचनिमिषाच्छायांगुलीश्चाधरं,
दृष्ट्वाऽऽशुमृतिस्तवनंतरमहो छायानरंपश्यति॥
तत्कर्णांसकरास्यपार्श्वहृदयाभावेक्षणाद्धीत्
स्वयं, दिङ्मूढोहिनरःशिरोविगमतोमासांस्त
षट्जीवति॥३६१॥

अर्थः- प्रातःकाळीं रवि पाठीस असतां छायापुरुषाच्या अंगुली व अधरोष्ठ दिसतील तर एकनिमिषांत मृत्यु होतो आणि छायापुरुषास व आ-

पणास अगदीं अंतर नसल्यास अर्ध्या निमिषांत मरण प्राप्त होतें; छाया-पुरुषाचे कान, खांदे, हात, मुख, कुशी व हृदय यांचा एकदम अभावझाल्यास अर्ध्याक्षणांत मरण येतें आणि छायापुरुषाचें शिरनष्ट होऊन पुरुषास दिशा भुली झालीतर तो सहामहिने जगतो. ॥ ३६१ ॥ ॥ ७ ॥

एकादिषोडशाहानि यदिभानुर्निरंतरम् ॥ वहेद्यस्यचवैमृत्युः शेषाहेनचमासिके ॥ ३६२ ॥

अर्थ- एकापासून सोळादिवस पर्यंत जर सारखा सूर्यस्वरच नेहमी वाहेल तर तसें झाल्यापासून महिन्याचे आंत तो मरण पावतो. ॥ ३६२ ॥

संपूर्णं(मास) वहतेसूर्यश्चंद्रमानैवदृश्यते ॥ पक्षेणजायतेमृत्युः कालज्ञानेनभाषितम् ॥ ३६३ ॥

अर्थ- जर महिना भर सारखा सूर्यच वाहून चंद्रस्वर मुळींच उदय पावत नाहीं तर त्याचा पंधरा दिवसानीं मृत्यु होतो असें कालज्ञानी सांगतात. ३६३

मूत्रंपुरीषंवायुश्च समकालंप्रवर्तते ॥ तदाऽसौचलितोज्ञेयो दशाहेम्रियतेध्रुवं ॥ ३६४ ॥

अर्थ- मूत्र, मळ आणि वायू हे एककाळीं चालूलागले असतां प्राणचंचळझाला असें समजावें तो मनुष्य दहादिवसांत मरतो. ॥ ३६४ ॥ ॥

संपूर्णं(मास) वहतेचंद्रः सूर्योनैवचदृश्यते ॥ मासेन जायतेमृत्युः कालज्ञेनानुभाषितं ॥ ३६५ ॥

अर्थ- सर्वकाळ चंद्र वाहत असून सूर्यस्वर मुळींच वाहत नसल्यास त्या मनुष्याचा मृत्यु एक महिन्यानें होतो असें कालज्ञाते सांगतात. ॥ ३६५ ॥

अरुंधतीं ध्रुवंचैव विष्णोस्त्रीणिपदानिच ॥ आयुर्हीनानपश्यंति चतुर्थंमातृमंडलं ॥ ३६६ ॥

अर्थ- ज्यांचें आयुष्य सरलें आहे ते लोक अरुंधती, ध्रुव, विष्णूचींपदें आणि चौथें मातृमंडल यांस पहात नाहींत. ॥ ३६६ ॥ ॥ ७ ॥

अरुंधतीभवेज्जिव्हा ध्रुवोनासाग्रमेवच ॥ भ्रुवोर्विष्णुपदंज्ञेयं तारकंमातृमंडलम् ॥ ३६७ ॥

अर्थ- अरुंधती म्हणजे जिव्हा, ध्रुव म्हणजे नासिकाग्र, भिवया तें विष्णुपद आणि तारक ( डोळ्यांतील बाहुली ) तेंमातृमंडल जाणावें; हें चारी

पदार्थ घुसूर्घुस दिसत नाहींत. ॥ ३६७ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

नवभ्रुवः सप्तघोषं पंचतारां त्रिनासिका ॥ जि-
ह्वामेकदिनं प्रोक्तं म्रियते मानवो ध्रुवं ॥ ३६८ ॥

अर्थः- भिवया दिसत नाहींशा झाल्या पासून नउ दिवसांत मनुष्य मर-
तो, कानांतील शब्द ऐकूं येत नाहीं असें झाल्यावर सात दिवसांत; तार-
क दिसेनासें झाल्यावर पांच दिवसांत; नासिका न दिसल्यास तीन दि-
वसानीं आणि जिव्हा दिसेनाशी झाली असतां एके दिवसांत मरण
येतें असें समजावें. ॥ ३६८ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

कोणावक्ष्णोरंगुलिभ्यां किंचित्पीड्य निरीक्षये
तु ॥ यदा न दृश्यते बिंदु-र्दशाहेन भवेन्मृतः ३६९

अर्थः- डोळ्याचे कोन दोन बोटानीं दाबून पाहावें जर त्या पहाण्यांत बिंदु
दिसणार नाहीं तर तो मनुष्य दहा दिवसानीं मरण पावेल. ॥ ३६९ ॥ ॥

तीर्थस्नानेन दानेन तपसा सुकृतेन च ॥ जपैर्ध्या
नेन योगेन जायते कालवंचनम् ॥ ३७० ॥ ॥

अर्थः- तीर्थाचें स्नान, दान, तप, जप, ध्यान आणि योग इत्यादि पुण्या-
चरणें करून कालाचें वंचन होतें. ॥ ३७० ॥ ॥ ॥ ७ ॥

शरीरं नाशयंत्येते दोषा धातुमलास्तथा ॥ स-
मस्तु वायुर्विज्ञेयो बलतेजो विवर्द्धनः ॥ ३७१ ॥

अर्थः- अनेक दुराचरणें व धातुगत मळ हे शरीराचा नाश करतात. वा
यु हा सारखा शरीरांत असतां बल व तेज यांचें वर्द्धन करतो. ॥ ३७१ ॥

रक्षणीयस्ततो देहो यतो धर्मादिसाधनं ॥ यो-
गाभ्यासात्समायांति, साध्यास्तु साध्यतां ॥,
असाध्या जीवितं घ्नंति न तत्रास्ति प्रतिक्रिया ३७२

अर्थः- देह हा धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचें साधन आहे म्हणून
याचें संरक्षण करावें पूर्वश्लोकांतील दोष योगाभ्यासानें जातात याकरि
तां योग करावा म्हणजे ते साध्य होतात वरील दोष असाध्य अ-
सल्यास ते प्राणाचा नाश करतात, त्यास कांहीं परिहार नाहीं. ॥ ३७२ ॥

येषां हृदि स्फुरति शाश्वतमद्वितीयं, तेजस्तमो-

निवइनाशकरंरहस्यं ॥ तेषामखंडशशिरम्यसु
कांतिभाजां, स्वप्नेऽपिनोभवतिकालभयंनराणां ७३

अर्थ- ज्याच्या हृदयांत अज्ञानसमुदायाचानाश करणारें अनादि, अप्रतिम आणि अत्यंत गोप्य असें हें शिवस्वरोदयज्ञान जागरूक आहे त्यांच्या शरीराची कांति पूर्णचंद्रासारखी आल्हादक होऊन स्वप्नांत देखील त्यास काला पासून भय नाहींसें होतें. ॥ ३७३ ॥ ॥ ॥ ७ ॥

इडागंगेतिविज्ञेया पिंगलायमुनानदी ॥ म-
ध्येसरस्वतींविद्या-त्प्रयागादिसमस्तथा ३७४

अर्थ- इडा (वामनाडी) ही गंगा होय; पिंगला (दक्षिणनाडी) ही यमुना होय आणि मध्यें जी सुषुम्ना ती सरस्वती जाणावी. ह्या नाडीत्रय संगम केवळ प्रयाग तुल्य होय. ॥ ३७४ ॥ ॥ ॥ ७ ॥

आदौ साधनमाख्यातं सद्यःप्रत्ययकारकं ॥ ब-
द्धपद्मासनोयोगी बंधयेदुड्डियानकं ॥ ३७५ ॥

अर्थ- आधीं तत्काळ विश्वास उत्पन्न करणारें साधन सांगितलें आहे, तें असें, योगी मनुष्यानें पद्मासन घालून उड्डियाननामक बंध साधावा. ७५

पूरकःकुंभकश्चैव रेचकश्चतृतीयकः ॥ ज्ञात
व्यो योगिभिर्नित्यं देहसंशुद्धिहेतवे ॥ ३७६ ॥

अर्थ- नंतर देहाची शुद्धता होण्याकरितां योगीजनानीं पूरक, कुंभक आणि रेचक असा तीनप्रकारचा प्राणायाम करावा. ॥ ३७६ ॥ ॥

पूरकःकुरुतेवृद्धिं धातुसाम्यंतथैवच ॥ कुंभ
केस्तंभनंकुर्या-ज्जीवरक्षाविवर्द्धनं ॥ ३७७ ॥

अर्थ- पूरक (बाहेरचा वायु आंत ओढणें) देहांत आर्द्रता आणि धातूचें समत्व करतो. कुंभक (बाहेरव आंत वायु चंचळ न होऊं देतां स्थिरकरणें) जीवाचें रक्षण चिरकाळ करतो. ॥ ३७७ ॥ ॥ ७ ॥

रेचकोहरतेपापं कुर्याद्योगपदंव्रजेत् ॥ पश्चा-
त्संग्रामवत्तिष्ठे-ल्लयबंधंचकारयेत् ॥ ३७८ ॥

अर्थ- रेचक (आंतून बाहेर वायु सोडणें) पापाचा नाश करतो याम-

* अपानास ऊर्ध्वगति देऊन नाभिरंध्रापाशीं आणणें यास योगशास्त्रांत उड्डियानबंध म्हणतात.

माणें त्रिविध प्राणायाम केल्यानें योगाचें स्थैर्य होतें नंतर संप्रज्ञात उ-भे राहिल्या प्रमाणें वस्वरअसून लयबंध करावा. ॥ ३७८ ॥ ॥

कुंभयेत्सहजंवायुं यथाशक्तिप्रकल्पयेत् ॥
रेचयेच्चंद्रमार्गेण सूर्येणापूरयेत्सुधीः॥ ३७९॥

अर्थः- वायूचें स्तंभन (कुंभक) सहजरीतीनें होईल तितकें यथाशक्ति करावें. रेचक चंद्रनाडीनें करावा आणि पूरक हा सूर्यनाडीचें द्वारानें करावा. ॥ ३७९॥ ॥ ॥ ॥ ॥

चंद्रं पिबतिसूर्यश्च सूर्यं पिबतिचंद्रमाः ॥ अ-
न्योन्यकालभावेन जीवेदाचंद्रतारकं॥ ३८०॥

अर्थः- चंद्रस्वरास सूर्यस्वर प्राशन करतो आणिसूर्यस्वरासचंद्रस्वर प्राशन करतो; यारीतीनें एकमेकांत त्यांचा लय केल्यानें चंद्रतारका आहेत तों पर्यंत योगी जीवंतराहतो. ॥ ३८० ॥ ॥ ॥ ॥

स्वीयांगेवहतेनाडी तन्नाडीरोधनंकुरु ॥ मु-
खबंधममुंचन्वै पवनंजायतेयुवा ॥ ३८१ ॥

अर्थः- आपल्या ज्या अंगास नाडी वाहते त्या अंगास त्या नाडीचें रोधन करावें आणि मुखबंध करून मुखांतून वायु सोडूनये असें केल्यानें योगी तारुण्य पावतो. ॥ ३८१ ॥ ॥ ॥ ॥

मुखनासाक्षिकर्णांता-नंगुलीभिर्निरोधयेत्॥
तत्त्वोदयमितिज्ञेयं षण्मुखीकरणंप्रियं॥ ३८२ ;

अर्थः- मुख, नासिकारंध्रें, नेत्र व कान हीं स्थानें हातांच्या अंगुलींनीं रोधून मग तत्त्वांचे उदय जाणावे; यामुद्रेस षण्मुखीकरण असें ह्मणतात.

तत्स्वरूपंगतिःस्वादो मंडलंलक्षणंत्विदं ॥ स
वेत्तिमानवोलोके संसर्गादपिमार्गवित् ॥ ३८३

अर्थः- षण्मुखी मुद्रेचा मार्ग जाणता योगी तिच्या योगानें तत्त्वांचें रूप, गति, स्वाद (रुचि) व मंडल हीं लक्षणें जाणतो. ॥ ३८३ ॥ ॥ ॥

निराशो निष्कलोयोगी नकिंचिदपिचिंतयेत् ॥
वासनामुन्मनांकृत्वा कालंजयतिलीलया ३८४

अर्थः- पूर्वोक्तमुद्राकरून निस्पृह व शुचि होऊन योग्यानें कांहींएक चिंत

न करूनये, मनांतून सर्व वासना नाहींशा कराव्या ह्मणजे तो योगी काळास जिंकतो. ॥ ३८४ ॥ ॥ः॥ ॥ ७ ॥

विश्वस्यवेदिकाशक्तिर्नेत्राभ्यांपरिदृश्यते ॥ तत्रस्थंतुमनोयस्य याममात्रंभवेदिह ॥ ३८५ ॥
तस्यायुर्वर्धतेनित्यं घटिकात्रयमानतः ॥ शिवेनोक्तंपुरातंत्रे सिद्धस्यगुणगव्हरे ॥ ३८६ ॥

अर्थ:- सर्व जगास जाणणारी शक्ति नेत्रांतून प्रगट होते, त्याशक्तीचे ठिकाणीं ज्याचें मन प्रहरभर स्थिर राहतें ॥ ३८५ ॥ त्याचें आयुष्य दररोज तीन घटिका प्रमाणें वाढतें; असें शंकरानीं तंत्रांत सिद्धांचे गुण सांगतानां कथन केलें आहे. ॥ ३८६ ॥ ॥ः॥ ॥ ७ ॥

बद्धंपद्मासनस्यागुदगतपवनंसन्निरुध्यामुमुच्चैः, तंतस्यापानरंध्रेक्रमजितमनिलंप्राणशक्त्यानिरुध्य ॥ एकीभूतंसुषुम्नाविवरमुपगतंब्रह्मरंध्रेचनीत्वा, निक्षिप्याकाशमार्गे शिवचरणरतायांतितेकेऽपिधन्याः ॥ ३८७ ॥

अर्थ:- योगी पुरुषानें पद्मासन घालून गुदस्थानीं रोध करावा आणि तेथील ( अपान नामक ) वायूस प्राणशक्तीच्या योगानें रोधून एकरूप करावें नंतर सुषुम्ना विवरानें त्या वायूस ब्रह्मरंध्राचे ठिकाणीं न्यावें आणि मग आकाश मार्गांत ठेऊन शिवचरणाचे ठायीं रममाण व्हावें जे योगी अशा स्थितींत असून प्राणोत्क्रमण करितात ते धन्य होत. ॥ ३८७ ॥ ॥

एतज्जानातियोयोगी एतत्पठतिनित्यशः ॥ सर्वदुःखविनिर्मुक्तो लभतेवांछितंफलं ॥ ३८८ ॥

अर्थ:- हें स्वरोदय शास्त्र जो जाणतो आणि जो नित्य पठण करितो तो सर्वदुःखा पासून मुक्त होऊन इच्छितफळ पावतो. ॥ ३८८ ॥ ॥

स्वरज्ञानंनरेयत्र लक्ष्मीःपदतलेभवेत् ॥ सर्वत्रचशरीरेऽपि सुखंतस्यसदाभवेत् ॥ ३८९ ॥

अर्थ:- स्वरज्ञान ज्यास आहे त्याचे चरणापाशीं लक्ष्मी वासकरते, व त्याचे शरीरास सर्वकाळ सर्व ठिकाणीं सुख होतें. ॥ ३८९ ॥ ॥ ७ ॥

प्रणवःसर्ववेदानां ब्राह्मणोभास्करोयथा॥मृ-
त्युलोकेतथापूज्यः स्वरज्ञानी पुमानपि॥३९०॥

अर्थ:- सर्व वेदांत जसा ॐकार पूज्य, किंवा जसा सूर्य ब्राह्मणास पूज्य, तसा स्वरज्ञानी पुरुष या मृत्युलोकांत पूज्य होय.॥ ३९०॥ ॥ ७ ॥

नाडीत्रयंविजानाति तत्त्वज्ञानंतथैवच॥नैव
तेनभवेत्तुल्यं लक्षकोटिरसायनं॥ ३९१॥

अर्थ:- ज्यास तिन्ही नाडींचें आणि तत्त्वांचें ज्ञान आहे त्या मनुष्याचे तुलनेस कोटि रसायनें ही येणार नाहींत.॥३९१॥ ॥ ॥ ७ ॥

एकाक्षरप्रदातारं नाडीभेदविवेचकम्॥पृथि-
व्यांनास्तितद्द्रव्यं यद्दत्वाचानृणीभवेत्॥३९२॥

अर्थ:- एक अक्षर (अद्वितीय अनंतब्रह्म) ज्यानें उपदेशिलें आणि नाडींचा भेद ज्यानें विवेचन करून सांगितला, त्यास जें द्रव्य दिल्यानें शिष्य ऋणमुक्त होईल तें द्रव्य पृथ्वीवर ही नाहीं.॥३९२॥ ॥ ॥ ७ ॥

स्वरस्तत्त्वंतथा युद्धं देविवश्यंस्त्रियस्तथा॥
गर्भाधानंचरोगश्च कलार्द्धेनैवसुच्यते॥३९३॥

अर्थ:- या शास्त्रांत स्वर, तत्त्वें, युद्ध, स्त्रियांचें वशीकरण, गर्भाधान आणि रोग याविषयींचा निर्णय एकत्र्या अर्द्धकलेंत केला जातो.॥ ३९३॥ ॥

एवंप्रवर्तितंलोके प्रसिद्धंसिद्धयोगिभिः॥चं-
द्रार्कग्रहणेजाप्यं पठतांसिद्धिदायकं॥३९४॥

अर्थ:- याप्रकारचें हें शास्त्र या लोकांत सिद्धयोग्यानीं प्रकाशित केलें; हें चंद्र, सूर्यग्रहणांत जप किंवा पठन केलें असतां सिद्धि प्राप्त होते.॥३९४॥

स्वस्थानेतुसमासीनो निद्रांचाहारमल्पकम्॥
चिंतयेत्परमात्मानंयोवेदसभविष्यति॥३९५॥
॥इतिश्रीउमामहेश्वरसंवादेस्वरोदयंसंपूर्णं॥

अर्थ:- स्वस्थानीं स्थिर बसून निद्रा व आहार परिमित सेवन करावा आणि हृदयांत स्वररूपी परमात्म्याचें चिंतन करावें म्हणजे त्यास स्वरज्ञान होऊन त्याचा उत्कर्ष होईल.॥३९५॥ ॥इतिस्वरोदयसार्थसमाप्त॥॥

समाप्त.

